

ओ३म्

आर्यधर्म मासिक पुस्तकांतून प्रसिद्ध झालेल्या विषयांची ग्रन्थमाला.

द्वितीयपुष्प,

# ब्रह्मचर्य.

हें

पुस्तक

श्रीदास विद्यार्थी

यांनीं लिहिलें




तें

मुंबईंत

शामराव कृष्ण आणि मंडळी

यांनीं

"तत्त्वविवेचक" छा० छा० प्रसिद्ध केलें.

सन १९०५. शके १८२७.

किंमत चार आणे.



वेदादिसच्छास्त्रांचें ज्ञान करून देणारें

# आर्यधर्म.

## धार्मिक मासिक पुस्तक.

सोप्या भाषेंत मूळ वैदिक धर्माची माहिती करून देणारें हें पहिलेंच पुस्तक चैत्र शके १८२६ मार्च.सन १९०४ पासून निघूं लागलें आहे. सनातन आर्यधर्माची ओळख करून घेणारानें अवश्य या पुस्तकाचें वाचन करून आपलें अमोलिक ग्रंथसंग्रहस्थान सुशोभित करावें. अवघ्या अकरा आणे किंमतींत अंतर्बाह्य सुंदर, सुबक, मोठें व प्रगल्भ असें मासिक पुस्तक आर्यधर्मासारखें क्वचितच मिळेल, जिज्ञासूनीं याचा अनुभव घ्यावा. किंमत वर्षाची अगाऊ ৶११ ट. ख. ৶३ अंक वर्षारंभापासून मागवावे. नमुन्या-करितां अंक मागविणारांनीं दीड आण्यांचीं टिकिटें पाठवावीं.

शामराव कृष्ण आणि मंडळी

१० / १८८०

ओ३म्.

# ब्रह्मचर्य.

## (१) ईश्वरप्रार्थना.

यदन्ति यच्चं दूरक भयं विन्दति मामिह ॥
पवंमान वि तज्जंहि ॥ ऋ० ७।२।१७।२१ ॥

(पवमान) हे शुद्ध व पूजनीय परमेश्वर! (इह) या संसारामध्यें दूर व समीप भागीं जें भय (माम्) मला (विन्दति) होत आहे (तत्) त्याचा (विजहि) नाश कर व मला सुखी कर.

यस्मान्न जातः परों अन्यो अस्ति य
आंविवेश भुवनानि विश्वां । प्रजापंतिः
प्रजयां सꣳरराणस्त्रीणि ज्योतींꣳषि सचते
स षोंडशी ॥ यजु० ८।३६ ॥

(यस्मात्) ज्या परमेश्वराहून मोठा (परः) दुसरा कोणीहि (न अस्ति जातः) नाहीं व जो (विश्वा भुवनानि) सर्व भुवनांमध्यें (आविवेश) भरून राहिला आहे तो सर्वांचा खरा रक्षक आहे. तोच सर्व जीवांनां सर्व पदार्थ देणारा आहे. (ज्योतींषि) सूर्य, अग्नि व वायु हेहि त्याणेंच केले आहेत व आपल्या सोळा कलांच्या योगानें सर्व विश्व तोच बनवितो. त्या परमेश्वराचीच मी भक्ति करतों व त्यालाच नमस्कार करतों.

स्वस्ति न इन्द्रो वृद्धश्रवाः स्वस्ति नः पूषा विश्ववेदाः ॥
स्वस्ति नस्तार्क्ष्यो अरिष्टनेमिः स्वस्ति नो बृहस्पति-
र्दधातु ॥ साम० उ० प्र० ११।३ ॥

हे ईश्वरा! तूं (इन्द्रः) परम ऐश्वर्ययुक्त, (वृद्धश्रवाः) ज्ञानमय, (पूषा) सर्वपोषक, (विश्ववेदाः) सर्वज्ञ, वेदांचा आधार, (तार्क्ष्यः) सर्वशक्तिमान्, दुःखें दूर करणारा,

आनंद देणारा व (बृहस्पतिः) ज्ञानाचा स्वामीहि तूंच आहेस. (स्वस्ति०) म्हणून तुं आम्हांला सुख दे.

**अभयं मित्रादभयममित्रादभयं ज्ञातादभयं परोक्षात् ॥ अभयं नक्तमभयं दिवा नः सर्वा आशा मम मित्रं भवन्तु ॥**

अथर्व०कां. १९।२।१५।६॥

हे परमात्मन्! मित्र व शत्रु, ज्ञात व अज्ञात पदार्थ या सर्वांपासून रात्रीं, दिवसा व सर्व दिशांमध्यें आम्हांला अभय असो. अर्थात् कोणापासूनहि आमचें अकल्याण न होवो.

**शान्ता द्यौः शान्ता पृथिवी शान्तमिदमुर्वन्तरिक्षम् ॥ शान्ता उदन्वती रापः शान्ता नःसन्त्वोषधीः ॥** अथर्व. १९।१।९।१॥

हे परमेश्वरा! तुझ्या कृपेनें आकाश, पृथिवी, अंतरिक्ष, जल व औषधी हे सर्व पदार्थ आम्हांला सुख देणारे होवोत. याप्रमाणें त्या सच्चिदानंद, निराकार, निर्विकार, निराधार, निगमप्रद, सर्वाधार, सर्वेश्वर, सर्वव्यापक, सर्वान्तर्यामि, अजर, अमर, अज, नित्य, शुद्ध व पवित्र अशा सृष्टिकर्त्या परमेश्वराची प्रार्थना करून सर्व पुरुषार्थाला व धर्माला आधारभूत असणाऱ्या ब्रह्मचर्याविषयीं, पुढील पिढीला लाभ व्हावा म्हणून तात्पर्यरूपानें विवेचन करतों.

## (२) ब्रह्मचर्य हें पुरुषार्थाचें मूळ.

**कुर्वन्नेवेह कर्माणि जिजीविषेच्छतꣳ समाः ॥ एवं त्वयि नान्यथेतोऽस्ति न कर्म लिप्यते नरे ॥ २ ॥** यजु० ४०।२॥

मनुष्यमात्राला सुख मिळविण्याची इच्छा आहे व त्याच्या प्राप्तीसाठींच त्याची सर्वदा धडपड चाललेली असते. दुःख दूर करून सुख मिळवावें व तें कायमचें

आपल्याला असावें हा मनुष्यमात्राचा जो मुख्य उद्देश असला पाहिजे तोच आहे पण त्याचे उपाय कोणते हें मात्र त्याला समजत नसल्यामुळें त्याचे परिश्रम व्यर्थ जाऊन इच्छित सुख त्याला मिळत नाहीं. सध्यां आपल्या या आर्यावर्तामध्यें असणारे आर्य लोक; विद्या, बल, बुद्धि, वीर्य, पराक्रम, शरीर, संपत्ति, धन, धान्य, राज्य, ऐश्वर्य, ऐहिक व परमार्थिक उन्नति इत्यादिकांपासून उत्पन्न होणाऱ्या सुखांला कां मुकत आहेत याचें कारण शोधूं गेलें असतां, आपल्याला "योग्य व सरळ उपायांचें अज्ञान" हेंच आढळून येईल. लोक प्रयत्न करीत असतांहि त्यांचे प्रयत्न फलद्रप होत नाहींत याचें कारण त्यांचे प्रयत्न सदोष आहेत हेंच आहे. वास्तविक उन्नतीचे मार्ग निराळे असून भलत्याच मार्गानें जे प्रयत्न करतात त्यांनां उन्नतीचा लाभ कसा होईल? उन्नतीचा खरा मार्ग परमेश्वरानें सांगितला आहे. तो असाः— मनुष्यांनीं (इह) या पृथ्वीवर (कर्माणि) उद्योग (कुर्वन्) करीत असावें व (शतं समाः) शंभर वर्षेंपर्यंत (जिजीविषेत्) जगण्याची इच्छा धरावी. हे मनुष्य हो! तुम्हीं वागण्याचा (एवम्) हाच एक मार्ग आहे. (इतः) याहून (अन्यथा) दुसरा (न अस्ति) मार्ग नाहीं. या प्रमाणें वागलें असतां (त्वयि नरे) तुम्हां मनुष्यांनां (कर्म न लिप्यते) दुःख होणार नाहीं; कर्माच्या बंधांत तुम्ही सांपडणार नाहीं.

याप्रमाणें वेदांचा उपदेश आहे. "कर्तव्य करा, शंभर वर्षें जगण्याचे प्रयत्न करा." असें वेद अनेकवार व अनेकप्रकारें सांगत असतां वेदमतानुयायी आर्यांचे वंशज, दैव, प्रारब्ध, कर्म, प्राक्तन, काळ, ग्रह, देवी, देवता, भूत, प्रेत, पिशाच्च, भैरव, मंत्र, तंत्र, जादू, टोणा, किमया इत्यादिकांचे भलभलते अर्थ समजून धूर्त व शठ लोकांच्या नादीं लागून फसत आहेत. आळस व मिथ्या दैववाद जास्त जास्त वळावत चालला आहे. पुरुषार्थ करणें हें आपल्या आधीन नाहीं असें समजत आहेत व त्यामुळें प्रत्यहीं जास्त जास्त दुःखामध्यें पडत आहेत. सर्व वेद "पुरुषार्थ करा" असें स्पष्ट सांगत आहेत व इतर शास्त्रेंहि तेंच सांगत आहेत. पहाः—

**पुरुषार्थोऽतः शब्दादिति बादरायणः ॥**

वेदान्तद० ३।४।१

"बादरायण व्यासाच्या मतानें मनुष्य पुरुषार्थ करूनच मोक्षसुखाचा स्वामी होतो." असें आहे. तसेंचः-



**यदा वै करोत्यथ निस्तिष्ठति नाकृत्वा निस्तिष्ठति कृत्वैव निस्तिष्ठति कृतिस्त्वेव विजिज्ञासितव्येति कृतिं भगवो विजिज्ञास इति ॥** छां. प्र. ७।२१ ॥



( यदा करोति ) ज्या वेळीं मनुष्य योग्य दिशेनें पुरुषार्थ करतो त्याच वेळीं त्याचीं दुःखें दूर होऊन सुखामध्यें ( निस्तिष्ठति ) तो राहतो. पुरुषार्थावांचून कधींहि आनंद प्राप्त होणें नाहीं. म्हणून पुरुषार्थ कोणता व तो साधण्याचा उपाय कोणता हें अवश्य समजून घेतलें पाहिजे.

**यद्वा तद्वा तदुच्छित्तिः पुरुषार्थस्तदुच्छित्तिः पुरुषार्थः ॥**

सांख्य० अ० ६।७०

**अथ त्रिविधदुःखात्यन्त निवृत्तिरत्यन्त पुरुषार्थः ॥**

सांख्य० अ० १।१

( तदुच्छित्तिः ) दुःखांची निवृत्ति किंवा नाश करणें हाच पुरुषार्थ होय. ( त्रिविधदुःखा० ) अध्यात्मिक–आपल्या अज्ञानापासून उत्पन्न होणारीं दुखें, आधिदैविक–अवर्षण, अतिवृष्टि, विद्युत्पतन, भूकंप इत्यादिकांपासून होणारीं दुःखें, व आधिभौतिक –दुष्ट व स्वार्थी मनुष्य, क्रूर पशु, पक्षी इत्यादिकांपासून उद्भवणारीं दुःखें; या तीनहि प्रकारच्या दुःखांची अत्यंत निवृत्ति करणें हाच ( अत्यन्त पुरुषार्थः ) मोठा पुरुषार्थ होय.

**फलं च पुरुषार्थत्वात् ॥** पू० मीमां० ३। १।९

पुरुषार्थ केला असतां फल प्राप्त होतें व फलप्राप्तीमुळें आनंद होतो.

**वीरः सुधीः सुविद्यश्च पुरुषः पुरुषार्थवान् ॥**
**तदन्ये पुरुषाकाराः पशवः पुच्छवर्जिताः ॥ २ ॥** सुभा० ॥

उत्तम विद्या शिकलेला, बुद्धिवान्, वीर व पुरुषार्थ करणारा तोच खरा पुरुष होय. जे आळशी व पुरुषार्थहीन (मनुष्य) आहेत ते सर्व पुच्छहीन पशुच होत.

**न लभन्ते विनोद्योगं जन्तवः सम्पदां पदम् ॥ १७ ॥**

सु० प्र० २

**पुरुषार्थस्य प्रभावेण तमस्तरति दुस्तरम् ॥ १ ॥** नि० वि० ॥

"उद्योगावांचून कोणालाहि संपत्ति मिळणार नाहीं" व "पुरुषार्थ करूनच कोणीहि अज्ञान व दुःख यांतून पार पडतो." याप्रमाणें सर्व सच्छास्त्रांची पुरुषार्थ करण्याविषयीं एकवाक्यता आहे. आळस व दैववाद यांनां कोठेंहि जागा मिळत नाहीं. यावरून उघड दिसतें कीं, दैव व आळस यांचा आश्रय करणारे लोक वेदादि सच्छास्त्रांचा उप-

देश मानीत नसल्यामुळें नेहेमीं अधोगतीला जातात व वेदांचा उपदेश प्रमाण मानणारे लोक सदैव पुरुषार्थ करीत असल्यामुळें नेहेमीं उन्नतीला जात असतात.

तात्पर्य, पुरुषार्थ करणें इष्ट आहे हें ठरलेंच पण त्याला आरंभ कसा करावा याचा आतां विचार करावयाचा. या सर्व विश्वामध्यें जड व चेतन असे मुख्य दोन भेद उघड उघड दिसत असून, विचाराअंतीं चेतनामध्येंहि दोन भेद आढळून येतात, मिळून एकंदर तीन भेद आहेत. प्रकृति, जीव व परमेश्वर हे ते (तीन) होत. जीव व परमेश्वर हे चेतनामध्यें येतात व प्रकृति ही जडामध्यें गणली जाते. प्रकृति ज्ञानरहित असल्यामुळें तिच्याकडून पुरुषार्थ होणें अशक्य आहे व परमेश्वर शुद्ध बुद्धमुक्त स्वभाव असल्यामुळें त्याला पुरुषार्थ करून कांहीं मिळ-वावयाचें नाहीं. आतां राहिला जीव. हा अंतःकरणादिकांनीं युक्त होऊन पूर्व कर्मानुसार मनुष्य, पशु, पक्षी आदि योनींमध्यें जातो व कृतकर्मांचीं फलें भोगतो. याला वारंवार जन्म घ्यावे लागतात व सुखःदुखें भोगावीं लागतात. अर्थात् हा पुरुषार्थ करणारा आहे. जसा हा पुरुषार्थ करील तसें फल याला मिळतें. म्हणू-नच "**कुर्वन्नेवेह कर्माणि जिजीविषेच्छतं समाः**" असा याला वेदद्वारा परमेश्वरानें उपदेश केला आहे. या प्रमाणें वागण्याचा निश्चय जर मनुष्यानें केला तर त्याला सुख प्राप्ति होईल यांत तिलप्राय शंका नाहीं. मनुष्यांमध्यें व इतर प्राण्यांमध्यें एक विलक्षण भेद आहे. तो हा कीं, इतर प्राण्यांचीं बालकें उपजतांच कमजास्त प्रमाणानें स्वावलंबी असतात पण मनुष्याचा प्रकार तसा नाहीं; हा लहानपणीं पूर्ण परावलंबी असतो. भेद हा आहे कीं, इतर प्राण्यांनां त्यांच्या व्यवहारापुरतें ज्ञान उपजतच असतें व तें वाढविण्याचें त्यांच्या शक्तीच्या बाहेर असतें; पण मनुष्याचें तसें नसतें, याला ज्ञान मिळवावयाचें असून तें त्याला पुरुषा-र्थाच्या जोरावर पाहिजे तेवढें मिळवितां येतें. सामान्यतः मनुष्य पांच वर्षांचा होई-पर्यंत तो परावलंबी असतो, नंतर हळू हळू त्याची सदसद्विवेकबुद्धि जागृत होऊं लागते व बरें वाईट कळूं लागतें. बरें वाईट समजूं लागल्यानंतरच कर्तव्याचा बोजा आंगावर जास्त जास्त पडूं लागतो. नऊ दहा वर्षांचा झाल्यावर विशिष्टपद्धतीनें मनुष्य न वागल्यास त्याला लोक दूषण देतात, यावरून उघड दिसतें कीं कर्तृत्वशक्ति स्वतंत्र रीतीनें मनुष्यमात्राचे ठिकाणीं आहे. म्हणूनच पुण्यपापाबद्दल मनुष्य जबाबदार समजला जातो "**न कर्तृत्वं न कर्माणि लोकस्य सृजति प्रभुः**" ॥गीता॥ "परमेश्वर कर्तृत्वशक्ति किंवा कर्में लोकांनां देत नाहीं," ते स्वतंत्रपणानें कर्में करतात म्हणून त्यांचीं ते बरीं वाईट फलें भोगतात. असें गीतेंत श्रीकृष्णानें सांगितलें आहे तें याच उद्देशाला धरून होय. अर्थात् मनुष्य पुरुषार्थ करण्यास स्वतंत्र आहे व त्याला जस-जसें समजूं लागतें तसतसा पुरुषार्थ करणें हा त्याचा धर्म होतो व जर तो न करील तर

त्याला सुख किंवा महत्त्व मिळणार नाहीं. पुरुषार्थ करण्याचें साधन शरीर, इंद्रियें, मन, बुद्धि हीं आहेत व तीं प्रायः सर्व मनुष्यांनां परमेश्वरानें दिलेलीं असतात. हीं साधनें सुस्थितींत ठेवून त्यांच्या सहाय्यानें महान् पुरुषार्थ करणें हें मनुष्याचें कर्तव्य होय. या साधनांची सुस्थिति ब्रह्मचर्यावरच अवलंबून आहे कारण, ब्रह्मचर्य जसें पालन केलें जाईल त्याप्रमाणें वीर्यादि सप्त धातू शरीरामध्यें स्थिर होऊन शरीर हवे ते सदुद्योग करण्यास समर्थ होतें. पण वीर्यक्षीण मनुष्याच्या मनांत जरी पुरुषार्थ करावयाचा असला तरी शारीरिक शक्तीच्या अभावामुळें त्याच्याकडून कांहींहि होत नाहीं म्हणून ब्रह्मचर्याची अत्यंत अवश्यकता आहे. आतां आधीं "**ब्रह्मचर्य**" शब्दाचे अर्थ काय काय होतात तें पाहूं. "**ब्रह्मणेवेदविद्यायै चर्यते इति ब्रह्मचर्यम् ।**" "वेद व सर्व विद्या शिकण्यासाठीं जें व्रत व जो नियम केला जातो, त्याला ब्रह्मचर्य असें म्हणतात" व जो ब्रह्मचर्यव्रत धारण करणारा असतो त्याला **ब्रह्मचारी** असें म्हणतात. "**ब्रह्मणि विद्यायां चरितुं शीलमस्यास्तीति ब्रह्मचारी**" किंवा "**ब्रह्म वेदस्तदध्ययनार्थं यद्व्रतं तदपि ब्रह्म तच्चरतीति ब्रह्मचारी ।**" "वेदविद्या व तीपासून उत्पन्न झालेल्या इतर सर्व सद्विद्या या शिकण्याला जितेंद्रिय झालें पाहिजे. व्यसनाधीनता सोडली पाहिजे. इंद्रियनिग्रहादिक जे नियम तेंच ब्रह्मचर्यव्रत होय व तसें ब्रह्मचर्य जो पाळतो व विद्या शिकतो तो ब्रह्मचारी समजावा. ब्रह्मचर्यामध्यें सर्व विद्या शिकावयाच्या असतातच पण विशेषतः वेदाध्ययन हें मुख्य आहे कारण, वेदांपासून इतर सर्व विद्यांचा व शास्त्रांचा उगम झाला आहे. ज्याअर्थीं ब्रह्मचर्यामध्यें ज्ञान मिळवावयाचें असतें व ज्ञानावर सर्व पुरुषार्थांची व त्यांच्या द्वारानें सर्व सुखांची भिस्त असते त्या अर्थीं ऐहिक व पारलौकिक सुखांच्या प्राप्तीसाठीं ब्रह्मचर्याची अत्यंत जरूरी आहे. जीवन मिळाल्यावर सुखें मिळूं शकतात, प्राणांचें रक्षण झालें असतां जीवन वाढतें व प्राणांचें रक्षण ब्रह्मचर्यानेंच होतें:—

**पृथक् सर्वें प्राजापत्याः प्राणानात्मसु बिभ्रति ॥ तान्त्सर्वान् ब्रह्म रक्षति ब्रह्मचारिण्या भृतम् ॥ २२ ॥** अथर्व० ११।३।१९ ॥

जगविद्या परमेश्वरानें (प्राजापत्याः) उत्पन्न केलेल्या सर्व प्रजा आपल्या (प्राणान्) प्राणांनां पृथक् पृथक् आपल्या (आत्मसु) आत्म्यांमध्यें (बिभ्रति) धारण करतात व त्यांचें पोषण करतात. अर्थात् प्रत्येक जीवाला स्वतंत्र प्राणशक्ति

परमेश्वरानें दिलेली आहे. (तान्) त्या (सर्वान्) सर्व प्राणांचें (ब्रह्मचारिण्या) ब्रह्मचाऱ्यानें-(भृतम्) स्वीकारलेलें (ब्रह्म) व्रत (ब्रह्मचारीपणाचे नियम)- (रक्षति) रक्षण करतें. अर्थात् प्राणांचें रक्षण, पोषण, व वाढ ब्रह्मचर्याच्या परिपालनानेंच होते. त्याच प्रमाणें शारीरिक, मानसिक व इतर पुष्कळ दुःखांची निवृत्तीहि ब्रह्मचर्याच्या परिपालनानेंच होते:—

**ब्रह्मचारी न कांचन आर्तिमार्च्छति ॥**

**शत० ब्रा० ११।३।६।२ ॥**

"ब्रह्मचर्य व्रताचे नियम जो कडकपणानें पाळतो त्याला कोणत्याहि प्रकारचें दुःख होत नाहीं." शरीराच्या आरोग्यालाहि ब्रह्मचर्यच कारणीभूत आहे. पहाः——

**पण्यतममायुःप्रकर्षकरं जराव्याधिप्रशमनं ऊर्जस्करं अमृतं शिवं शरण्यं उदात्तं मत्तःश्रोतुमर्हथ उपधारयितुं प्रकाशयितुं च प्रजानुग्रहार्थमार्षं ब्रह्मचर्यम् ॥**

**चरक० चि० अ० १ र० ४**

भृगु, अंगिरा, अत्रि, वसिष्ठ, कश्यप, अगस्त्य, पुलस्त्य, वामदेव, असित, गौतम इत्यादि ऋषींनां इंद्रानें सांगितलें कीं, "हे ऋषिलोक हो! अनेक पुण्यकर्में करण्यास व सदुद्योग करण्यास साधनीभूत, पूर्ण आयुष्य करून देणारें, अकालीं म्हातारपण न आणणारें, आरोग्य वाढविणारें, कांति व तेज वाढविणारें, अपमृत्यूपासून सोडविणारें, कल्याणकारक, शरीरांतील शक्तीला वाढविणारें व सर्व प्रकारचें कल्याण करणारें असें ब्रह्मचर्य आहे हें कसें पालन करावयाचें तें मजकडून शिका व पुढील संतानांच्या हितासाठीं स्वतः आचरण करून त्याचा प्रसार करा. तसेंचः——

**आहारशयनब्रह्मचर्यैर्युक्तिप्रयोजितैः शरीरं धार्यते नित्यमगारमिव धारणैः ॥ अष्टांगहृद० सू० ७।५१ ॥**

ज्याप्रमाणें खांबांच्या योगानें घर उभें राहतें त्याचप्रमाणें शरीराची सुस्थिति स्वच्छ व हितकारक अन्न, नियमित झोंप व कडकडित ब्रह्मचर्य यांवर अवलंबून आहे. हीं वचनें पाहून ज्यावेळीं आपण या आर्यावर्ताकडे पाहतों तेव्हां असें आढळून येतें कीं, ज्यावेळीं ब्रह्मचर्याचा आधारस्तंभ आमच्या देशाला आधार देऊन उभा होता तोंपर्यंत हें घर दिव्य दिसत होतें पण तो हल्लीं तुटून पडल्यामुळें तेंच घर आतां निराधार होऊन ढांसळून खालीं पडत आहे. जर पुनः आर्यावर्ताची स्थिति सुधारावयाची असेल तर

पुढच्या पिढीमध्यें कडकडित ब्रह्मचर्याचें तेज चमकूं लागेल असे प्रयत्न केले पाहिजेत पहा:—

आयुस्तेजो बलं वीर्यं प्रज्ञा श्रीश्च महायशः ॥ पुण्यंच मत्प्रियत्वं च हन्यतेऽब्रह्मचर्यया ॥ गौतमस्मृ० अ० ४

"ब्रह्मचर्याचें पालन न झालें तर शरीर वीर्यहीन व क्षीण होऊन आयुष्य, तेज, बल, वीर्य, बुद्धि, श्री (शोभा) सौंदर्य, धन, यश, पुण्य व प्रीति हीं सर्व त्याला नाहींशीं होतात." आपल्या देशामध्यें ब्रह्मचर्यभ्रष्टता अनेक कारणामुळें लवकर होऊं लागली व त्याचीं वर लिहिलेलीं फलें सध्यां लोक भोगित आहेत, याचे पुरावे देण्याची गरज नाहीं इतके ते प्रत्येकाला समजण्याइतके स्पष्ट आहेत. म्हणून या अवनतींतून सुटण्यासाठीं ब्रह्मचर्याचें परिपालन होणें इष्ट आहे. ब्रह्मचर्याचें फल पहा:—

आचार्यो ब्रह्मचारी ब्रह्मचारी प्रजापतिः ।
प्रजापतिर्वि राजति विराडिन्द्रोऽभवद्वशी ॥

अथर्व० ।११।३।१९।१६

(ब्रह्मचारी) ब्रह्मचर्य उत्तम रीतीनें पाळण करणारा आचार्य होतो व तोच (प्रजापतिः) संतानांचें पालन करण्यासहि समर्थ असतो किंवा तोच प्रजांचें रक्षण करणारा राजाहि होऊं शकतो. (विराट्) उत्तमप्रकारें राज्य करणारा व (वशी) सर्वांनां आपल्या स्वाधीन ठेवणारा, सर्वांनां वश करणारा (इन्द्रः) इंद्र होतो. [कारण "द्वयेन वा एष इन्द्रो भवति यच्च क्षत्रियो यदु च यजमानः"। शत०५।३।५।२७॥ उत्तम क्षत्रिय व उत्तम यज्ञ करणारा हे इंद्र होत. इंद्र होण्याला हीं दोन कारणें आहेत.] तसेंच:—

ब्रह्मचर्येण तपसा राजा राष्ट्रं विरक्षति ॥

अथर्व० ११।३।१९।१७॥

ब्रह्मचर्य परिपालन करण्यानेंच राजा राष्ट्राचें रक्षण करूं शकतो. ब्रह्मचर्यभ्रष्ट वीर्यहीन राजा राष्ट्रपरिपालन करूं शकतच नाहीं. तसेंच "ब्रह्मचर्येण वै लोकान् जनयन्ति परमर्षयः। "भारत शां० अ० २४३।६ ॥" महर्षिलोक ब्रह्मचर्य पालन

करितात म्हणूनच त्यांचा लोकलोकांतरांमध्यें विजय होतो." ब्रह्मचर्यानें वीर्यरक्षण होतें म्हणून शत्रूंचा पराजय करण्यास ब्रह्मचर्याची आवश्यकता आहे. पहाः—

**ब्रह्मचर्यं परोधर्मः स चापि नियतस्त्वयि । यस्मात्तस्मा-**
**दहं पार्थ रणेऽस्मिन्विजितस्त्वया ॥ ७१ ॥**

भारत० आदि० १७०

ज्या वेळीं गंधर्वाचा युद्धांत अर्जुनानें पराभव केला तेव्हां तो अर्जुनाला म्हणतो कीं, "हे अर्जुना! ब्रह्मचर्य हाच परम धर्म आहे. त्याच्या बलानेंच तूं माझा पराभव केलास कारण, मी ब्रह्मचर्यभ्रष्टतेनें वीर्यक्षीण झालों आहें." याचा सूक्ष्मदृष्टीनें विचार करतां ब्रह्मचर्याची किती अवश्यकता आहे हें वाचकांच्या तेव्हांच लक्ष्यांत येईल. तसेंच--

**वैखानसा वालखिल्यास्तथाचान्ये तपोधनाः ॥ रसाय-**
**नमिदं प्राश्य बभूवुरमितायुषः ॥ ब्राह्मंतपो ब्रह्मचर्यं**
**चेरुश्चात्यन्त निश्चयाः ॥ रसायनमिदं ब्राह्ममायुष्कामः**
**प्रजोजयेत् ॥** चरक० चि० १।१ ॥

( वैखानस ) वानप्रस्थ तपस्वी, वालखिल्यऋषी, व इतर मुनी यांनीं निश्चयानें कडकडित ब्रह्मचर्य पालन केलें म्हणून त्यांचें आयुष्य दीर्घ झालें. म्हणून ज्याला आपलें आयुष्य वाढविणें असेल त्याणें ब्रह्मचर्याचें पालन करावें." या चरकाच्या सांगण्याकडे आधुनिक लोकांनीं अवश्य लक्ष्य द्यावें. तसेंच--

**वीततन्द्राक्लमाश्वासन् निरातङ्काः समाहिताः ॥ मेधास्मृति-**
**बलोपेताश्चिररात्रं तपोधनाः ॥** चरक० चि० १।१ ॥

ब्रह्मचर्याच्यायोगानें गुंगी, थकवा, अशक्तता, रोगीपणा हीं नाहींशीं होऊन बुद्धि, स्मरणशक्ति, बळ हीं वाढतात; व चित्ताची एकाग्रताहि होते. त्याचप्रमाणें—

**कामांश्चेष्टान् समश्नुते ॥ चरक० १।१ ॥**

**धर्म्यं यशस्यमायुष्यं लोकद्वयरसायनम् ॥ अनुमोदामहे**
**ब्रह्मचर्यमेकान्तनिर्मलम् ॥ अष्टाङ्ग० ४० ॥**

"धर्म, यश व आयुष्य यांनां वाढविणारें व ऐहिक व पारमार्थिक उन्नतीला साधनीभूत असें हें ब्रह्मचर्य आहे. म्हणून त्याचें प्रत्येकानें पालन करून आपला फायदा करून घ्यावा." याप्रमाणें चरकाचार्यांनें व वाग्भट्टानें ब्रह्मचर्याचें महत्व गाईलें आहे. दीर्घ आयुष्य व आरोग्य यांच्याच आधीन आपलीं सर्व सुखें आहेत व ती दोनहि याच्या योगानें साधतात. पहा—

**ब्रह्मचर्यमायुष्यकराणाम् ॥ चर० सू० २९ ॥**

"आयुष्याला हितकारक असणाऱ्या सर्व पदार्थांमध्यें ब्रह्मचर्य हेंच मुख्य आहे." सध्यां प्रमाणें पूर्वीं बालविवाह व अकालीं गर्भाधान होत नसे. चोवीस पासून अठ्ठेचाळीस वर्षें पर्यंत गुरुकुलवास करून कडकडित ब्रह्मचर्य पाळल्यावर मग विवाहाची तयारी होत असे, पण सध्यां मुंज (उप+नयन?) करून दोन तीन दिवस होतात तोंच विवाहाची तयारी होते व वाडवडिलांनां नातवाचें तोंड पाहण्याची अकालीं इच्छा होते. पण त्यांच्या हें लक्ष्यांत येत नाहीं कीं, अशीं वीर्य अपरिपक्व असतांना होणारीं मुलें कमकुवत व अकालीं मरणारीं होणार. या घातुक समजुतींनीं आमचें शंभर वर्षांचें आयुष्य छत्तीस वर्षांवर आलेलें आहे. तें पुनः शंभर वर्षांचें करणें आमच्याच आधिन आहे. पूर्वींप्रमाणें ब्रह्मचर्याची मर्यादा आम्ही वाढविली म्हणजे झालें. ब्रह्मचर्यपालन न होण्यानें वर्णसंकर होतो व कुल कलंकित होतें. पहा:—

**श्वेतकेतुर्हारुणेय आस त ँ् ह पितोवाच श्वेतकेतो वस ब्रह्मचर्यं न वै सोम्यास्मत्कुलीनोऽननूच्य ब्रह्मबन्धुरिव भवति ॥ छान्दो० ६।१।१॥**

"श्वेतकेतूला त्याचा पिता म्हणतो कीं, हे श्वेतकेतो! तूं पूर्ण ब्रह्मचर्याचें पालन कर कारण, हे बाळा! आमच्या कुलांत ब्रह्मचर्याचें पालन न करतां कोणीहि राहत नाहीं. ब्रह्मचर्याचें पालन न केलें तर विद्या येत नाहीं व तो शूद्रसम होतो." या प्रमाणें पूर्वीं ब्रह्मचर्याची योग्यता मानीत होते. तसेंच—

**अथ यद्यज्ञ इत्याचक्षते ब्रह्मचर्यमेव तत् ब्रह्मचर्येण ह्येव यो ज्ञाता तं विन्दतेऽथ यदिष्टमित्याचक्षते ब्रह्मचर्यमेव तत् ब्रह्मचर्येण ह्येवेष्टात्मानमनुविन्दते ॥ १ ॥ अथ यत्सत्रायणमित्याचक्षते ब्रह्मचर्यमेव तद् ब्रह्मचर्येण ह्येव सत**

**आत्मनस्त्राणं विन्दतेऽथ यन्मौनमित्याचक्षते ब्रह्मचर्यमेव तद् ब्रह्मचर्येण ह्येवात्मानमनुविद्य मनुते ॥ २ ॥**

छान्दो० ८।५ ॥

"ब्रह्मचर्य हाच एक मोठा यज्ञ आहे. याच्या योगानें मनुष्य ( तं विन्दते ) परमेश्वराला प्राप्त करून घेतो. जें कांहीं इष्ट आहे तें खरोखर ब्रह्मचर्यच होय कारण, ब्रह्मचर्यानेंच विद्या, बुद्धि इत्यादि उत्तम गुण प्राप्त होऊन आत्म्याची उन्नति होते. आतां ( सत्रायणम् ) ( आत्मनःत्राणम् ) ब्रह्मचर्याच्या योगानेंच आत्म्याचें यथावत् रक्षण होतें व त्याणें मननशक्ति वाढून मुनि बनतां येतें व परमेश्वरप्राप्ति होते. तसेंच वृद्धगौतम स्मृतींत "**ब्रह्मचर्यं परंतीर्थम्** ॥ ( गौ० स्मृ० अ० २० )" "ब्रह्मचर्य हेंच मोठें तीर्थ आहे" असें म्हटलें आहे कारण याच्या योगानें शरीर शुद्ध व जोरदार होतें. तसेंच--

**तदाहुर्न ब्राह्मणं ब्रह्मचर्यमुपनीय मिथुनं चरेत् । गर्भो वा एष भवति ब्रह्मचर्यमुपैति ॥ शत० ब्रा० ११।३।६।१६ ॥**

ब्रह्मचर्यावस्थेमध्यें ( मिथुनं न चरेत् ) कधींहि मैथुन करूं नये. ज्याप्रमाणें गर्भ गर्भाशयांत असतांना, कांहींएक कुचेष्टा करीत नाहीं त्याचप्रमाणें विद्यारूप आईचे ठिकाणीं ब्रह्मचारी हा गर्भ राहिलेला असतो म्हणून त्याणें कांहींहि वीर्यक्षीण होण्यासारखी कुचेष्टा करतां नये. ब्रह्मचर्यरक्षणानें बल, बुद्धि, वीर्य, विद्या व पराक्रम हीं वाढतात. या शतपथांतील आधारावरून "**वीर्यरक्षण**" हें ब्रह्मचर्यांतील मुख्य अंग आहे असें होतें. वीर्यस्खलन झालें कीं, ब्रह्मचर्यहीनत्वाचे दुर्गुण आले. यासाठीं सर्व विद्यार्थ्यांनीं वीर्यरक्षण करण्यास झटावें.

**ब्रह्मचर्य प्रतिष्ठायां वीर्यलाभः ॥** योगद० २।३८ ॥

"ब्रह्मचर्याचें पालन केलें असतां वीर्य स्थिर होतें." या योगदर्शनांतील उक्तीप्रमाणेंच मनूचेंहि मत आहेः—

**एकः शयीत सर्वत्र न रेतः स्कन्दयेत्कचित् ॥ कामाद्धि स्कन्दयन् रेतो हिनस्ति व्रतमात्मनः ॥ १८० ॥**

मनु० अ० २

"ब्रह्मचाऱ्यानें एकटें निजावें. वीर्यनाश होईल असें वर्तन कधींहि करूं नये. क्षणिक सुखासाठीं वीर्यनाश करणाऱ्याला ब्रह्मचर्यरक्षणापासून "दीर्घ आयुष्यादिक होणारे नफे होत नाहींत." तसेंच—

**लिङ्गसंयोगहीनं यच्छब्दस्पर्शविवर्जितम् ॥ श्रोत्रेणश्रवणं चैव चक्षुषा चैव दर्शनम् ॥ ८ ॥ वाक्संभाषाप्रवृत्तं यत् तन्मनःपरिवर्जितम् ॥ बुद्ध्या चाध्यवसीयीत ब्रह्मचर्यमकल्मषम् ॥ ९ ॥ भारत० शां० २१४**

"लिंगसंयोग न करणें याला ब्रह्मचर्य असें म्हणतात. किंवा गुह्येंद्रियाला कोणत्याहि हस्तादिकांचा स्पर्श न करणें, तसेंच विषयासंबंधीं वाईट भाषण न ऐकणें, स्त्रियांकडे वाईट नजरेनें न पाहणें, वाईट भाषणें न बोलणें, मनानें स्त्रीविषयक चिंतन न करणें व बुद्धीनें वाईट विचार न करतां सदा अर्थज्ञानपूर्वक अध्ययन करीत राहणें यालाच उत्तम ब्रह्मचर्य असें म्हणतात. अर्थात् मैथुन न करणें याचें नांव ब्रह्मचर्य होय. मैथुन आठ प्रकारचें आहेः—

**स्मरणं, कीर्तनं केलिःप्रेक्षणं गुह्यभाषणम् ॥ संकल्पोऽध्यवसायश्च क्रियानिष्पत्तिरेवच ॥ एतन्मैथुनमष्टाङ्गं प्रवदन्ति मनीषिणः ॥** दक्षस्मृति० अ० ७

"स्त्रीचें स्मरण करणें, तिचें वर्णन करणें, तिच्याशीं खेळणें, तिला वारंवार पाहणें, गुप्तभाषण करणें, मनांत संकल्प करणें, तिचा निजध्यास करणें व मैथुन करणें हे आठ मैथुनाचे प्रकार आहेत." यांतील एक एक प्रकारहि वीर्यनाशाला पुरे असतो. म्हणून यांपैकीं कोणताहि प्रकार आपणाकडून न होईल असें प्रत्येकानें प्रथम वयांत आचरण ठेवावें व ब्रह्मचर्य उत्तम पालन करून तेजःपुंज बनावें. वीर्यभ्रष्ट होत असतां, काय हानि होत आहे हें समजत नाहीं पण त्यापासून जेव्हां निस्तेजता, कमकुवतपणा, बुद्धिमांद्य इत्यादि प्रकार वाटतात व जगाच्या जीवनकलहांत जेव्हां पीछेहाट होऊं लागते तेव्हा तोच मनुष्य "दैव" म्हणत बसतो. पण मग पश्चात्ताप होऊन काय उपयोग? या साठीं आरंभापासून सर्वांनीं खबरदारी घ्यावी. या ठिकाणीं कोणी म्हणेल कीं, विद्याभ्यास न करतां जितेंद्रिय राहून वीर्यरक्षण केलें तर ब्रह्मचर्य पालन केल्यासारखे होईल कीं काय? याला उत्तर असें कीं, तें अंशमात्रानें ब्रह्मचर्य होईल. पूर्णपणें होणार नाहीं कारण, शास्त्रांमध्यें "जितेंद्रिय राहून विद्याभ्यास करणें" याला पूर्ण ब्रह्मचर्य असें म्हटलें आहे. "**गुप्तेन्द्रियस्योपस्थस्य संयमः ।**" योगद. २।३०॥ "गुप्त-उपस्थ इंद्रियाचा संयम" हें ब्रह्मचर्य असें व्यासांनीं योगदर्शन-भाष्यांत सांगितलें आहे. पण तो अर्थ त्या विषयापुरताच समजावयाचा. कारण——

शिष्यवृत्तिक्रमेणैव विद्यामाप्नोति यः शुचिः ॥
ब्रह्मचर्यव्रतस्यास्य प्रथमः पाद उच्यते ॥ १ ॥

भार० उ० ४४.

" ब्रह्मचर्याचें अवलंबन करून विद्या शिकणें हा ब्रह्मचर्याचा एक भाग आहे." असें व्यासानींच भारतांत सांगितलें आहे.

धर्मादयो द्वादश यस्य रूपमन्यानि चाङ्गानि तथा बलं च ॥ आचार्य योगे फलतीति चाहुर्ब्रह्मार्थ योगेन च ब्रह्मचर्यम् ॥ भारत० उद्यो० ४४।१७ ॥

धर्मश्च सत्यं च तपोदमश्च अमात्सर्यं ह्रीस्तितिक्षाऽनसूया ॥ दानं श्रुतं चैव धृतिः क्षमाच महाव्रता द्वादश ब्राह्मणस्य ॥ भार० उ० ४९०/९।

" धर्म, सत्य, तप, इंद्रियनिग्रह, मत्सर न करणें, वाईट काम करण्यास लाजणें, सहन शक्ति, निंदा न करणें, दान, सदुपदेश ऐकणें, धारणाशक्ति, क्षमा हें बारा प्रकारचें ब्रह्मचर्याचें रूप आहे. ( आचार्य योगे ) या ब्रह्मचर्याची फलश्रुति गुरुजवळ राहून विद्याभ्यास केल्यानें होते." येथवर दिलेल्या उताऱ्यांवरून ब्रह्मचर्यापासून शारीरिक मानसिक व आत्मिक सुखें मिळतात असे ठरलें. ब्रह्मचर्य धारण करून विद्या शिकावयाची हेंहि वरील आधारांवरून उघड होतें, आतां विद्या कशाला म्हणावें तें पाहिलें पाहिजेः—

## ( ३ ) विद्या म्हणजे काय?

विद्ययाऽमृतमश्नुते ॥ यजु० ४० ॥

" ज्यापासून परम सुखाची प्राप्ति होते, त्या ज्ञानाला विद्या असें म्हणतात. तसेंचः—

क्षरं त्वविद्या ह्यमृतं तु विद्या ॥ श्वेताश्वतर० अ० ९।

" जिचा नाश होत नाहीं ती विद्या व नाश होणारी ती अविद्या होय. तसेंच—

अविद्या च विद्यालिङ्गम् ॥ वैशेषि०७।१।२१॥

" अविद्येहून विरुद्ध गुणांनीं जी युक्त, ती विद्या समजावी ". किंवा—

**अनित्याशुचिदुःखानात्मसु नित्यशुचिसुखात्मख्यातिरविद्या ॥ योगद० २।५॥**

" अनित्य वस्तूला शाश्वत टिकणारी मानणें, अशुद्धाला स्वच्छ समजणें, दुःखकारणाला सुखकारण समजणें, जडाला आत्मा मानणें हीच अविद्या होय. तात्पर्य, वस्तुमात्राचें यथार्थ ज्ञान ती विद्या व विपरीत ज्ञान ती अविद्या होय."

**तद्दुष्टं ज्ञानम् ॥ ११ ॥ अदुष्टं विद्या ॥१२॥ वैशेषि० ९।२॥**

" विपरीत समज होणें ही अविद्या व यथार्थ ज्ञान ही विद्या. " " विद्-ज्ञाने " या धातूवरून " विद्या " हा शब्द झाला आहे. " वेत्ति यया सा विद्या " " जिच्या योगानें पदार्थांचें यथार्थ ज्ञान होतें ती विद्या होय. " विद्येचें फल शतपथांत सांगितलें आहे:—

**विद्यया तदारोहन्ति यत्र कामाः परागताः ॥ न तत्र दक्षिणा यान्ति नाविद्वा ँ सस्तपस्विनः ॥**

**शतप० १०।४।२।१६॥**

" ज्या ठिकाणीं सर्व सुखांची परमावधी होते त्या ठिकाणीं विद्येच्या योगानें मनुष्य जातो. तें स्थान, धन व विद्याहीनतेनें केलेलें तप, यांनीं प्राप्त होत नाहीं. फक्त विद्या शिकणारांनांच तें प्राप्त होतें." तसेंच—

**विद्यया देवलोको वै लोकाना ँ श्रेष्ठस्तस्माद् विद्यां प्रश ँ सन्ति ॥ बृहदार० ३।५ ॥**

" विद्या शिकल्यानें विद्वानांच्या स्थानाची प्राप्ति होते, म्हणूनच विद्येची प्रशंसा करतात. " तसेंच—

**विद्वा ँ सो हिदेवाः ॥ शतप० ३।५।६।१० ॥**
**अन्तस्थंच बहिष्ठं च साधियज्ञाधिदैवतम् ॥ ज्ञानान्विता हि पश्यन्ति ते देवास्तात ते द्विजाः ॥**

**भारत० शां० २३८।२३ ॥**

" विद्वान् हेच देव होत. " " जे सर्व ठिकाणीं आंतबाहेर व्यापून असणाऱ्या पर-

मेश्वराला जाणतात तेच विद्वान् व तेच देव होत." इतकी विद्येची थोरवी आहे. तसेंच—

**केन ब्रह्मत्वं क्रियते त्रय्या विद्ययेति ॥ ऐतरे० पं० ५।५। त्रयीं विद्यामवेक्षेत वेदेषूक्तामथाङ्गतः ॥ ऋक्साम वर्णाक्षरतो यजुषोऽथर्वणस्तथा ॥ भारत० शां० २३६॥१ ॥**

चारहि वेदांमध्यें असणाऱ्या त्रयीविद्येच्या अध्ययनानें ब्रह्माचें ज्ञान होतें. [ सध्यां कोणी "त्रयी या शब्दानें फक्त तीनच वेदांचें ग्रहण करतात व अथर्व वेद आधुनिक (१) असें ठरवतात. पण ही त्यांची चुकी आहे असें वरील श्लोकावरून व्यक्त होईल. चारहि वेदांमध्यें तीन विद्या सांगितल्या आहेत–म्हणून चारहि वेदांस संकेतानें "**त्रयीविद्या**" असें म्हणतात. असो ] तसेंच—

**विद्यातः पुरुषविशेषो भवति ॥ नि० पू० १।५।२ ॥**

"विद्या शिकल्यानें मनुष्याला श्रेष्ठत्व येतें." विद्येनेंच त्याचा अधिकार व मान्यत्व हीं वाढतात. तसेंचः—

**तपो विद्या च विप्रस्य निश्रेयसकरं परम् ॥ तपसा किल्बषं हन्ति विद्ययाऽमृतमश्नुते ॥ मनु० अ० १२।१०४।**

"सत्यभाषणादिक तप व विद्या हीं दोन मनुष्याला कल्याण करणारीं साधनें आहेत. तपानें सर्व दोष नाहींसे होतात व विद्येनें सुख मिळतें."

**ऋषिभिर्ब्राह्मणैश्चैव गृहस्थैरेव सेविता ॥ विद्या तपो विवृद्ध्यर्थं शरीरस्य च शुद्धये ॥ मनु० अ० ६।३० ॥**

"तपाची वृद्धि व शरीराची शुद्धि यांसाठीं पूर्वीच्या सर्व ऋषी, ब्राह्मण व गृहस्थ यांनीं विद्येचें अध्ययन केलें." ज्यावेळीं या आर्यावर्तांतील लोक, ब्रह्मचर्यानें वीर्यरक्षण करून अनेक विद्यांमध्यें पूर्ण विद्वान् होत होते त्यावेळीं हाच देश बल, बुद्धि, वीर्य, पराक्रम, राज्य, ऐश्वर्य याणीं भूषित होऊन सर्वांच्या अग्रस्थानीं गेला होता, पण सध्यां वीर्यक्षीणत्व, विद्याहीनत्व व आलस्य या दुर्गुणांचें प्राधान्य झाल्यामुळें याची कशी दीन अवस्था झाली आहे. हरएक बाबतींत हा हीन व दीन झाला आहे. विद्येच्याच योगानें दीनावस्था नाहींशी होणारी आहे. आजकाल अन्य देश विद्येच्याच योगानें पुढें गेले आहेत. यूरोप, अमेरिका,

जपान हे देश एका भौतिक विद्येच्या जोरावर जर एवढे पराक्रम करीत आहेत तर मग आध्यात्मिक, आधिदैविक व भौतिक या तीनहि विद्यांची जर आम्ही प्राप्ति करून घेतली तर आमचीहि त्यांच्या पेक्षां जास्त उन्नति होईल यांत शंका नाहीं. म्हणून सध्यां आर्यावर्तातील लोकांनीं पुरुषार्थ, ब्रह्मचर्य, व विद्या यांचाच आश्रय केला पाहिजे. पहा—

**विद्ययाविन्दतेऽमृतम् ॥ केनोप० २।४॥**

"विद्येच्याच योगानें परम आनंदाची प्राप्ति होते." तसेंच—

**मातेव रक्षति पितेव हिते नियुक्ते ॥ कान्तेव चाभिरम यत्यपनीय खेदम् ॥ कीर्तिंच दिक्षु विमलां वितनोति लक्ष्मीम् ॥ किं किं न साधयति कल्पलतेव विद्या ॥२॥**

**—भोजप्रबन्ध.**

"मातेप्रमाणें रक्षण करणारी, पित्याप्रमाणें सन्मार्गाला लावणारी, कान्तेप्रमाणें मन रंजविणारी, खेद नाहींसा करणारी, कीर्ति व लक्ष्मी यांनां वाढविणारी अशी विद्या आहे" अर्थात् विद्येपासून अनंत फायदे आहेत, म्हणून सर्वांनीं विद्याभ्यास करीत असावें. तसेंच—

**विद्या बृंहणानाम् ॥ चरक० सू० ३०**

"सर्वांच्या उत्कर्षाचा व वृद्धीचा हेतु विद्या ही आहे" सर्व सुखें, ऐहिक व पारमार्थिक उन्नति ही सर्व विद्येवरच अवलंबून आहे. तसेंच—

**सर्वद्रव्येषुविद्यैव द्रव्यमाहुरनुत्तमम् ॥ अहार्य्यत्वादनर्घ्यत्वादक्षयत्वाच्च सर्वदा ॥ ४ ॥ संगमयति विद्यैव नीचगापि नरं सरित् ॥ समुद्रमिव दुर्धर्षं नृपं भाग्यमतःपरम् ॥५॥ विद्याददाति विनयं विनयाद्याति पात्रताम् ॥ पात्रत्वाद्धनमाप्नोति धनाद्धर्मं ततःसुखम् ॥ ६ ॥ हितोप० प्र०**

"सर्व द्रव्यांमध्यें विद्या हें द्रव्य विलक्षण आहे. याला चोर चोरूं शकत नाहीं, याचा कधीं नाश होत नाहीं व हें क्रयविक्रय करतां येण्यासारखें नाहीं." जर विद्या ही विकत घेतां किंवा देतां आली असती, तर अनेक आळशी श्रीमंत लोकांनां पैशाच्या जोरावर विद्वान् बनतां आलें असतें. पण विद्याधन हें स्वतःच मेहेनत करून मिळ-

वावयाचें असल्यामुळें आळशांनां त्यापासून आपला नफा करून घेतां येत नाहीं. विद्येला मूल्य नाहीं. मेहेनत करणाराला ती फुकट प्राप्त होते व आळशी माणसानें लाखों रुपये खर्च केले तरी ती त्याला मिळणार नाहीं. अशी अमूल्य विद्या फुकट, केवळ मेहेनतीनें मिळत असतां, जर कोणी शिकला नाहीं तर त्याच्यासारखा अभागी कोण बरें असणार? "ज्याप्रमाणें वाहत जाणारी नदी, तिच्यांत पडलेल्या तृणादिक पदार्थांनां समुद्रापर्यंत घेऊन जाते, तद्वत् नीचकुलोत्पन्न पुरुषालाहि विद्या महान् राजाकडे घेऊन जाते व भाग्यवान् बनविते, किंवा ती रंकाचा राजा करते" "विद्येपासून विनय, विनयामुळें पात्रता, पात्रतेनें धन व त्यापासून सुख प्राप्त होतें." तात्पर्य, सर्व सुखांच्या मूलस्थानीं विद्याच आहे. शिवाय—

**अपूर्वशब्दकोशोऽयं विद्यते तव भारति ॥ व्ययतो वृद्धिमाप्नोति क्षयमाप्नोति संवृतः ॥ —रसकल्पद्रुम १०।१**

"विद्या हा एक अपूर्व खजिना आहे. हा खर्च केला असतां वाढतो व राखून ठेवला असतां कमी होतो." विद्या जर दुसऱ्यांना शिकवीत गेलें तर ती वाढत जाते व जर ती कोणाला सांगितली नाहीं तर ती दिवसानुदिवस विसरली जाते. तसेंच—

**अनेक संशयोच्छेदी परोक्षार्थस्य दर्शकम् ॥ सर्वस्य लोचनं शास्त्रं यस्य नास्त्यन्ध एव सः ॥ ११ ॥ हितो. मित्र.**

"विद्येच्या योगानें सर्व संशय दूर होतात, अप्रत्यक्ष पदार्थांचें ज्ञान होतें. विद्या हेच ज्ञान चक्षू आहेत. ज्याला हे चक्षू नाहींत तो आंधळा आहे म्हणून समजावें." ज्याप्रमाणें आंधळ्याला जवळ उत्तम पदार्थ असून त्यांचें ज्ञान नसतें, त्याचप्रमाणें विद्याहीनाला असलेल्या पदार्थांचा उपयोग करतां येत नाहीं. तसेंच—

**हर्तुर्याति न गोचरं किमपि शं पुष्णाति यत्सर्वदा ॥ ह्यर्थिभ्यः प्रतिपाद्यमानमनिशं प्राप्नोतिवृद्धिं पराम् ॥ कल्पान्तेष्वपि न प्रयाति निधनं विद्याख्यमन्तर्धनम् ॥ येषां तान्प्रति मानमुज्झत नृपाः कस्तैस्सहस्पर्धते ॥ भर्तृह. नीति. १६ ॥**

"विद्या चोराच्या नजरेला पडत नाहीं, शिकणारांचें कल्याण करते, विद्यार्थ्यांना शिकविण्यानें गुरुची दुप्पट वाढते, कधींहि नाश पावत नाहीं, ही ज्यांच्या जवळ आहे अशा विद्वानांजवळ राजेहि नमून असतात" तसेंच—

विद्यानाम नरस्य रूपमधिकं प्रच्छन्न गुप्तं धनम् ॥ विद्या-भोगकरी यशः सुखकरी विद्यागुरूणां गुरुः ॥ विद्या बन्धुजनो विदेश गमने विद्यापरं दैवतम् ॥ विद्या राजसु पूजिता न तु धनं विद्याविहीनः पशुः ॥ भर्तृ० नि. २०।
धनहीनो न हीनस्तु ह्यधनवान्निर्मलं कुलम् ॥ विद्याविहीनो यः कश्चित् स हीनः सर्ववस्तुषु ॥ १२८ ॥ नी. शा०
विद्यारूपं कुरूपाणाम् ॥ चाणक्य० अ० ३।९॥
विद्यासमा नास्ति शरीरभूषणा ॥ नी. शा. २०॥

" विद्या हें पुरुषाला भूषण आहे. तें गुप्तधन आहे. विद्येच्या योगानें भोग, यश, सुख हीं प्राप्त होतात, अडचणीच्या वेळीं विद्येच्या सहाय्यानें उत्तम सल्ला मिळते, परदेशीं विद्या ही सहाय्य कर्त्री आहे. विद्वानाची राजाहि मानमान्यता करतो. म्हणून सर्वांनीं विद्या शिकावी. जो विद्या शिकत नाहीं तो खरोखर पशूच होय."
" ज्याला विद्या येत नसेल त्याला संपत्ती आदिक साधनें असून नसल्यासारखींच होत." कित्येकवेळीं तर असें आढळून येतें कीं, अविद्वानाला संपत्ति मिळाली असतां त्याचा वास्तविक फायदा कोणताहि न होतां, तो तिचा उपयोग वाईट कामांकडे करून आपलाच नाश करून घेतो. पण विद्वान् संपत्तीपासून आपला व दुसऱ्याचा नफा करतो. तसेंच—

रूपयौवनसंपन्ना विशालकुलसंभवाः ॥ विद्याहीना न शोभन्ते निर्गन्धा इव किंशुकाः ॥ २९ ॥ हि. प्र.
किं कुलेन विशालेन विद्याहीनेन देहिनाम् ॥ विद्यावान् पूज्यते लोके नाविद्यः परिपूज्यते ॥ २२६ ॥ नी. शा.

" उत्तम शरीर, सौंदर्य, व उत्तम कुळांत जन्म हीं असून जर विद्या नसेल तर त्यांची कांहीं शोभा होत नाहीं. कोणत्याहि कुळांत जन्म असो, तो सुंदर असो किंवा कुरूप असो, विद्वान् असेल तरच त्याची प्रशंसा सर्वत्र होते व विद्याहीनाची सर्वत्र निंदा होते." तसेंच—

धर्माधर्मौ न जानाति लोकोऽयं विद्यया विना ॥
तस्मात्सदैव धर्मात्मा विद्यादानरतो भवेत् ॥ १ ॥
ज्यो. त. रघ.

नास्तिविद्यासमं चक्षुः ॥ शांति० अ. १७९।३९ ॥

"मनुष्याला कर्तव्य व अकर्तव्य यांची ओळख विद्येवांचून होत नाहीं. धर्मात्म्या पुरुषानें लोकांना विद्येचा उपदेश सदैव करीत असावें." श्रीमान् व राजेरजवाडे यांनीं उत्तम उत्तम पाठशाळा स्थापन कराव्या व लोकांना विद्यादान करावें. कारण "विद्या हे उत्कृष्ट डोळे आहेत." अर्थात् हिच्या सहाय्यानें सर्व विषय स्पष्ट दिसतात. तसेंच—

विद्या प्रशंसा ॥ पूर्व मीमां० १।१ ॥ शोभतेऽस्य मुखम् ॥
शबर भाष्यम् ।

"विद्येच्या योगानें मनुष्याची प्रशंसा होते व त्याची सर्वत्र शोभा होते. व

विद्यैव तु निर्धारणात् ॥ ४ ॥ उ० मीमां० ३।३॥
तच्छ्रुतेः ॥ ४ ॥ उ० मी० ३।४॥

"मुक्ति मिळण्याचें साधन विद्याच आहे. कारण वेदाच्या ज्ञानानें मुक्ति होते व वेद हीच परम विद्या आहे."

कामधेनुगुणा विद्या ह्यकाले फलदायिनी ॥ प्रवासे मातृ-
सदृशी विद्या गुप्तं धनं स्मृतम् ॥ ५ ॥ चाण० नी० ४
शुनःपुच्छमिव व्यर्थं जीवितं विद्यया विना ॥ न गुह्य-
गोपने शक्तं न च दंश निवारणे ॥ १९ ॥ चाण० नी. ८

"विद्या हीच काम धेनु आहे. ही हवी तेव्हां फलद्रूप होते. प्रवासामध्यें आई प्रमाणें सहाय्य करते" "विद्याहीनमनुष्याचें जीवित अगदीं व्यर्थ होय. जसें कुत्र्याचें शेपूट पश्चिमद्वार झांकण्याच्या कामीं किंवा माशा हांकण्याच्या कामींहि उपयोगांत येत नाहीं तद्वत अविद्वान् पुरुषाचें जीवित व्यर्थ होय." तात्पर्य विद्या सर्व प्रकारें उपयोगी आहे. आजकाल ज्या कांहीं सुधारणा व जीं सुखें दिसत आहेत तीं सर्व विद्येमुळेंच झालेलीं आहेत. व पुढेंहि विद्येनेंच मानवजातीची प्रगति होईल. विद्या

पुष्कळ प्रकारच्या आहेत व त्या सर्व अत्यंत उपयोगाच्या आहेत. त्यांपैकीं एकीचा जरी उत्तम अभ्यास केला तरी त्यापासून अनंत लाभ होतो. विद्या गुरूकडे जाऊन शिकावी लागते, म्हणून आतां गुरू कसा असावा व त्याचीं कर्तव्यें काय हें पाहिलें पाहिजे:—

---

## ( ४ ) गुरु किंवा आचार्य.

**श्रुत ँ ह्येवमेव भगवद्दृशेभ्य आचार्याद्धैव विद्या विदिता साधिष्ठं प्रापयतीति ॥ छान्दो० ४।९।३ ॥**

जाबालऋषि गौतमाला म्हणतो—"हे भगवन्! आपल्या सारख्या महात्म्यांकडून मी असें ऐकलें आहे कीं, आचार्यांकडून शिकलेली विद्या उत्कृष्ट फल देणारी होते." गुरुमुखानें तत्त्वज्ञान लवकर व सहज होतें. याची सत्यता प्रत्येक ठिकाणीं येण्यासारखी आहे.

**यथा खनन् खनित्रेण नरो वार्यधिगच्छति ॥ तथा गुरुगतां विद्यां शुश्रूषुरधिगच्छति ॥ २१८ ॥ मनु० २**
**आचार्यः शास्त्राधिगमहेतूनाम् ॥ चरक. सू० २९ ॥**

"ज्याप्रमाणें जमीन खणून पाणी मिळतें त्याचप्रमाणें गुरुची शुश्रूषा केल्यानें गुरूकडची विद्या मिळते." "आचार्यांकडूनच सर्व शास्त्रें शिकतां येतात." तसेंच—

**आचार्ययोनिमिह ये प्रविश्य भूत्वा गर्भं ब्रह्मचर्यं चरन्ति ॥ इहैव ते शास्त्रकारा भवन्ति विहाय देहं परमं यान्ति योगम् ॥ भारत. उद्यो० ४४।६।**

"जे ब्रम्हचर्य धारण करून गुरुकडून विद्या शिकतात ते याच ठिकाणीं विद्वान् व शास्त्रकार होतात व अंतीं मुक्त होतात."

**ग्रामाद्ग्रामं पृच्छन् पण्डितो मेधावी गान्धारानेवोपसम्पद्येतैवमेवेहाचार्यवान् पुरुषो वेद ॥ छान्दोग्य० ६।१४॥**

" ज्याप्रमाणें गांधार देशाचा मार्ग विचारीत विचारीत त्या देशाला पांथस्थ जातो, त्याचप्रमाणें गुरूला प्रश्न करून विद्यार्थी विद्या मिळवितो." सध्या कित्येकांचा असा समज आहे कीं अध्ययन न करतां "मंत्राचा जप" केला असतां एकदम विद्वान् बनतां

येतें. पण हा केवळ भ्रम आहे. पूर्वी भारद्वाजऋषीचा मुलगा यवक्रीत हाहि याचप्रमाणें अध्ययन करण्याचें सोडून तप करूं लागला होता व त्याला वाटत होतें कीं, तपाच्या योगानें आपण विद्वान् होऊं पण त्याला इंद्रानें सांगितलें कीं.—

अमार्ग एष विप्रर्षे येन त्वं यातुमिच्छसि ॥ किं विघातेन
ते विप्र गच्छाधीहि गुरोर्मुखात् ॥ २२ ॥

भा० वनपर्व० १३९

" हे ब्राह्मणा! तप करून तूं विद्वान् होऊं इच्छितोस, पण हा तुझा मार्ग खोटा आहे. गुरूजवळ जा व विद्या शिकून विद्वान् हो व्यर्थ कालक्षेप करूं नकोस." हा इंद्राचा उपदेशहि त्याणें ऐकला नाहीं तेव्हां इंद्रानें—

वालुकामुष्टिमनिशं भागीरथ्यां व्यसर्जयत् ॥
सेतुमभ्यारभच्छक्रो यवक्रीतं निदर्शयन् ॥ ३३ ॥
तं ददर्श यवक्रीतो यत्नवन्तं निबन्धने ॥
प्रहसन् चाब्रवीद्वाक्यमिदं स मुनिपुङ्गवः ॥ ३४ ॥
किमिदं वर्तते ब्रह्मन् किंच तेह चिकीर्षितम् ॥
अतीव हि महान् यत्नः क्रियतेऽयं निरर्थकः ॥ ३५ ॥

इन्द्र उवाच ।

बान्धिष्ये सेतुना गङ्गां सुखः पन्था भविष्यति ॥
क्लिश्यते हि जनस्तात तरमाणः पुनः पुनः ॥ ३६ ॥

यवक्रित उवाच

नायं शक्यस्त्वया बद्धुं महानोघस्तपोधन ॥
अशक्याद्विनिवर्तस्व शक्यमर्थं समारभ ॥ ३७ ॥

इन्द्र उवाच

यथैव भवता चेदं तपो वेदार्थमुद्यतम् ॥
अशक्यं तद्वदस्माभिरयं भारः समाहितः ॥ ३८ ॥

भा० वन० १३९

"इंद्रानें यवक्रीताच्या समोर मूठ मूठ वाळू गंगेच्या जोरदार प्रवाहांत टाकण्यास प्रारंभ केला. तें पाहून यवक्रीत म्हणतो" "हे इंद्रा! अरे हें काय चालवलें आहेस?"

इंद्र म्हणतो "हे विप्रा! या गंगेंतून तरून जाण्यास लोकांना फार त्रास होतो, म्हणून तिच्यावर या वाळूचा पूल बांधतों. हा पूल तयार झाला म्हणजे लोकांचा त्रास तरी चुकेल." हें ऐकून हंसत यवक्रीत म्हणतो–"हें होणें अशक्य आहे. कारण पाण्याचा ओघ जबरदस्त आहे" इंद्र म्हणतो, "जसें हें अशक्य तसें तप केल्यानें वेदाध्ययन होणेंहि अशक्यच आहे. या साठीं हे ऋषिपुत्रा! तूं गुरूकडे जा व विद्याध्ययन कर. असा व्यर्थ कालक्षेप करूं नकोस." या गोष्टीचें तात्पर्य हें आहे कीं, गुरूजवळ अध्ययन केल्यावांचून विद्या येणें शक्य नाहीं.

---

## (५) आचार्यांचीं कर्तव्यें.

आचार्यः कस्मात् । आचारं ग्राहयति । आचिनोति अर्थान् । आचिनोति बुद्धिमिति वा ॥ निरु० १।१।२।२।

"जो सदाचार शिकवितो, सर्व विद्या पूर्ण स्पष्टीकरणासह सांगतो व बुद्धीला तीव्र आणि सूक्ष्म करतो तो खरा आचार्य होय." असें यास्काचार्यांनीं निरुक्तांत सांगितलें आहे. जो केवळ पैशा साठीं दोन चार तास नेमलेले धडे शिकवितो व मुलांच्या शारीरिक, मानसिक व नैतिक उन्नतीकडे मुळींच पाहत नाहीं त्याला गुरु किंवा आचार्य असें कधींहि म्हणतां येणार नाहीं.

आचिनोति हि शास्त्रार्थं आचारे स्थापयत्यपि ॥ स्वयमाचरते यस्मात् आचार्यः परिकीर्त्यते ॥

ऐतरे० आरण्य० सा. भा० १

उपनीय तु यः शिष्यं वेदमध्यापयेद्द्विजः ॥
सकल्पं सरहस्यं च तमाचार्यं प्रचक्षते ॥ १४ ॥
अल्पं वा बहुवा यस्य श्रुतस्योपकरोति यः ॥
तमपीह गुरुं विद्याच्छ्रुतोपक्रियया तया ॥ १४९ ॥

मनु० अ० २

"जो शिष्याचें उपनयन करून त्याला कल्प व रहस्य यांसह वेद शिकवितो त्याला आचार्य असें म्हणतात." "निरनिराळीं शास्त्रें शिकविणें, सदाचाराचे मार्ग दाखविणें

व त्याप्रमाणें स्वतः वागणें हीं आचार्यांचीं मुख्य कर्तव्यें आहेत." "थोडी बहुत विद्या जो शिकवितो त्याला गुरू असें म्हणतात." तसेंच—

**आम्नायत्वविज्ञानाच्चराचरसमानतः ॥ यमादियोग**
**सिद्धित्वादाचार्य इति कथ्यते ॥ सु० ॥**
**यस्माद्धर्मानाचिनोति स आचार्यः ॥ १३ ॥**
**स हि विद्यातस्तं जनयति ॥ १४ ॥ तच्छ्रेष्ठं जन्म ॥१५॥**
**—आपस्तम्भ० सू० १।१।१॥**

"आम्नाय ज्ञान, चराचरांवर प्रीति व यमनियमादि योगसिद्धि हीं ज्याला आहेत तो आ–चा–र्य होय" "जो धर्माचा प्रसार करतो तो आचार्य. तो विद्येच्या योगानें शिष्याला उत्तम जन्म देतो. हाच खरोखर महत्वाचा जन्म होय."

**पिता ह्येनं जनयति पुरुषं पुरुषर्षभ ॥**
**प्रज्ञां ददाति चाचार्यस्तस्मात्स गुरुरुच्यते ॥ १ ॥**
**वा० रामायण० अयो० स० १११**

**त्रयः पुरुषस्यातिगुरवो भवन्ति माता पिता आचार्यश्च॥**
**विष्णु स्मृ० अ० ३१ ॥**

"पिता पुत्राला फक्त जन्म देतो, पण आचार्य त्याला सदसद्विवेक शक्ति व बुद्धि देतो; म्हणून आचार्य श्रेष्ठ होय." तसेंच "मनुष्यानें आई, बाप व गुरु या तिघांला मान दिला पाहिजे कारण मुलाला आईकडून पहिलें शिक्षण मिळतें. ज्या-वेळीं मन अगदीं कोमल असतें तेव्हां आईच त्याला योग्य दिशा लावते. या नाजुक स्थितीचा विचार केला असतां स्त्रियाहि सुशिक्षित पाहिजेत हें उघड होतें पहा-

**गुरूणां चैव सर्वेषां माता परमको गुरुः ॥**
**आदिद्पर्व १९५।१६ ॥**

**नास्ति वेदात्परं शास्त्रं नास्ति मातृसमो गुरुः ॥**
**भारत अनु० १०।६९ ॥**

"वेदासारखें शास्त्र नाहीं व आई सारखा उत्तम गुरु नाहीं." "सर्व गुरूमध्यें मातेसारखा दुसरा गुरु नाहीं." अशा प्रकारच्या माता ज्या ठिकाणच्या असतील व

ज्या ठिकाणीं आया लहानपणींच योग्य वळण लावतील, त्या देशांत कर्ते पुरुष उपजण्यास कठीण पडणार नाहीं. तसेंच पिता हा दुसरा गुरु आहे:—

**निषेकादीनि कर्माणि यः करोति यथाविधि ॥**
**संभावयति चान्नेन स विप्रो गुरुरुच्यते ॥ १४२ ॥**
**उत्पादकब्रह्मदात्रोर्गरीयान्ब्रह्मदः पिता ॥ १४६ ॥**
**मनु अ० २**

**हितोपदेष्टा शिष्यस्य सुविद्याध्यापको गुरुः ॥ ८० ॥**
**शुक्रनीति. १**

" गर्भाधानादि संस्कार व अन्नपानादिकांनीं पुत्राचें पालन करतो म्हणून पिताहि गुरूच ठरतो." " जन्मदेणारा पिता व विद्या शिकविणारा यांत विद्या शिकविणारा श्रेष्ठ होय." कारण " तो विद्या शिकवून पुढील आयुष्य ज्याच्या योगानें सुखदायक होईल असें वळण त्याला लावतो " अर्थात् गुरू हा धार्मिक, विद्वान्, बुद्धिमान्, परोपकारी, सदाचारी, निराभिमानी, विज्ञानी, शांत, इंद्रियनिग्रही, धैर्यवान्, गंभीर, चतुर, अनुभवी, देशहितैषी, देशकालवर्तमानजाणणारा, प्रगल्भ, सुलभ रीतीनें शिकविणारा, निरोगी, निर्व्यसनी, विवेकी, सत्यप्रिय, पाठनक्रमजाणणारा, शिष्यस्वभाव ओळखणारा, लोकप्रिय व मृदुभाषी इत्यादि अनेक सद्गुणांनीं युक्त असावा. गुरूच्या आंगच्या गुणांचा परिणाम शिष्यावर होत असल्यामुळें गुरू नेहेमीं सद्गुणीच असला पाहिजे. पहा:—

**आचार्यं परीक्षेत । तद्यथा । पर्यवदातश्रुतम् परिदृष्टकर्माणं दक्षं दक्षिणं शुचिं जितहस्तम् उपकर्णवन्तम् सर्वेन्द्रियोपपन्नं प्रकृतिज्ञं प्रतिपत्तिज्ञम् अनुपस्कृतविद्यम् अनसूयकम् अकोपनं क्लेशक्षमं शिष्यवत्सलंमध्यापकं ज्ञापनासमर्थमित्येवंगुणो ह्याचार्यः स्वक्षेत्रम् आर्तवो मेघ इव शस्यगुणैः सुशिष्यमाशु संपादयति ॥** चरक० वि० ८

( पर्यवदातश्रुतम् ) ज्याणें उत्तम रीतीनें विद्याभ्यास केला आहे, ( परिदृष्टकर्माणम् ) क्रिया व प्रक्रिया ( कला कौशलादिक ) ज्याणें पाहील्या आहेत, व जो दक्ष, चतुर, सरळ, शुद्ध, कुकर्म न करणारा, ( उपकर्णवन्तम् ) शिकवण्याचीं सर्व साधनें ज्याच्या जवळ आहेत, सर्व इंद्रियें ज्याचीं दृढ आहेत, ( प्रकृतिज्ञम् ) शिष्याचा स्वभाव

जाणणारा व ज्याला राजा व राज्य यांसंबंधीं पूर्ण माहिती आहे, तसेंच जो प्रत्येक पदार्थाचे गुणधर्म जाणतो, ( प्रतिपत्तिज्ञम् ) उद्योगी, दोषरहित, प्रगल्भ, शिकलेल्या विद्या ज्याला चांगल्या आठवत आहेत, करावयाच्या गोष्टी कशा कराव्या हें ज्याला पूर्णपणें माहित आहे ( अनसूयकम् ) निंदा न करणारा, क्रोध न करणारा, शिकविण्याचे क्लेश सहन करणारा, शिष्यांवर प्रीति करणारा, शिकविण्याची पद्धत ज्याची सुलभ आहे असा गुरु असावा." एवढे सर्व गुण एके ठिकाणीं असणें जरी कठीण आहे तथापि शक्य तेवढे गुरु बनणारानीं आंगीं आणण्याचा प्रयत्न करावा. शिकवून समजूत घालण्याच्या ऐवजीं, छडीचा प्रयोग करून मारानें शिष्याला गप्प करणारे गुरू सध्यां चहूंकडे आहेत; या त्यांच्या कृतीनें मुलांची कल्पक शक्ति नाहींशी होते व विचारांचा जोर संपतो. म्हणून गुरूजींनीं विद्यार्थ्यांची समजूत घालण्याचा प्रयत्न करावा व त्यांची बुद्धि वाढेल असें शिक्षण द्यावें. [ सध्यां या आर्यावर्तांत दुसरी एक गुरुपरंपरा चालली आहे. ती ही कीं, कानांत गुरुमंत्र (?) सांगावयाचा. हे गुरुमंत्र सांगणारे स्वतः निरक्षर भट्टाचार्य, ढोंगी, दुरात्मे, वेदशास्त्रशून्य व आपमतलबी असतात. हे लोक भाविक व साध्या स्त्रीपुरुषांनां उघड फसवितात व आपल्या नीच मनोवृत्ती तृप्त करतात. हे ढोंगी लोक स्त्रियांनांहि एकांतांत नेऊन डोक्यावरून कपडा घेऊन गुरूपदेश (?) करतात. या करण्यापासून होणारे अनर्थ, आजकाल जेथें जेथें या उपदेशाचा प्रघात आहे तेथें तेथें सहज दृष्टोत्पत्तीस येतात. वास्तविक यांच्या तोंडांतून उच्चारल्या जाणाऱ्या विवाक्षित नांवापासून कोणतेंहि धर्मोन्नतीचें कृत्य होणें नाहीं. [ **त्याचा मार्ग निराळच गुरू दाखवितात. या ढोंगी लोकांपासून धर्माच्या नांवाखालीं अधर्म व अनीति पसरत चालली आहे. तिचा त्या त्या ठिकाणच्या सद्गृहस्थानीं प्रतिकार करावयास लागलें पाहिजे.** ] वर चरकाचार्यांनीं सांगितलेल्या गुणांनीं युक्त असतील तेच खरे गुरू होत व त्यांच्या सत्य उपदेशानेंच आत्मोन्नति खरोखर होईल. विद्याहीन व आपमतलबी जो असेल त्याला कधींहि गुरु करूं नये—

**त्यजेद्धर्मं दयाहीनं विद्याहीनं गुरुं त्यजेत् ॥ चा.नी.४।१६॥**

"ज्या कृत्यांत दया नाहीं, हिंसा होते, तें धर्मकृत्य नव्हे असें समजावें व ज्याला विद्या येत नाहीं तो गुरुहि नव्हे" असें समजावें.

## ( ६ ) गुरुकुलवास.

**शास्त्राय गुरुसंयोगः ॥ शुक्रनी० १।१४८ ॥**

**त्रयो धर्मस्कंधा यज्ञोऽध्ययनं दानमिति प्रथमस्तप एव**

**द्वितीयो ब्रह्मचर्याचार्यकुलवासी तृतीयोऽत्यन्तमात्मानमाचार्यकुले अवसादयन् सर्व एते पुण्यलोका भवन्ति ब्रह्मसंस्थोऽमृतत्वमेति ॥ छान्दो० २।२३।१ ॥**

"विद्या शिकण्यासाठीं गुरु केला पाहिजे." [ सध्यां कित्येक लोक समजतात त्याप्रमाणें कानांत चार अक्षरें फुंकण्यास गुरूची गरज नाहीं. असलें फसविण्याचें काम करून पैसे लुबाडणारे जे असतात ते गुरु या पदवीला योग्य नसतात. म्हणून ] ज्यांनां ज्यांनां आपल्या संतानांची काळजी वाटत असेल व आत्मोन्नतीची लालसा असेल, त्यांणीं त्यांच्या शिक्षणक्रमाकडे व त्यांच्या गुरूंकडे योग्य रीतीनें पाहिलें पाहिजे. ज्या ठिकाणीं उत्तम विद्या शिकतां येईल तेथेंच त्यांच्या शिकण्याची सोय करावी व त्यांच्या धार्मिक शिक्षणाचीहि व्यवस्था नीट आहे कीं नाहीं, तें पहावें. "धर्माचे मुख्य अंश तीन आहेत. एक यज्ञ, विद्वत्सत्कार, हवन, पदार्थांची योजना, क्रियाकौशल वगैरे, दुसरा ब्रह्मचर्य धारण करून आचार्याजवळ गुरुकुलामध्यें राहणें व तिसरा आमरणान्त विद्याभ्यास करण्याचा निश्चय करून पूर्ण ब्रह्मचारी बनून गुरुकुलीं विद्याभ्यास करीत राहणें. हे सर्व प्रकार उपयुक्त व महत्वाचे आहेत." पहा—

**ब्रह्मचारिणं परिददामि दीर्घायुष्ट्वाय सुप्रजात्वाय सुवीर्याय रायस्पोषाय सर्वेषां वेदानामाधिपत्याय सुश्लोक्याय स्वस्तये ॥ सांख्यायन गृह्यसू० १।२॥**

"ब्रह्मचर्य धारण करून राहिल्यानें दीर्घ आयुष्य, उत्तम संतान उत्पन्न होण्याचें सामर्थ्य, वीर्यवृद्धि, वैभव, ज्ञानाची प्राप्ति, कीर्ति व कल्याण हीं होतात." पहा, प्राचीन महर्षींची कशी तऱ्हा असे ती. सध्यां आपण मुलगा बारा वर्षांचा झाला नाहीं तोंच त्याला चतुर्भुज करून बंधनांत टाकतों. याच कारणास्तव प्रजा दिवसानुदिवस निस्तेज व निरुत्साही होत आहे. सृष्टीच्या प्रारंभापासून भारती युद्ध होईपर्यंत ब्रह्मचर्य पालन करण्याची परिपाठी होती व म्हणून त्यावेळीं भीष्माचार्यादिकांसारखीं तेजस्वी रत्नें चमकत होतीं व म्हातारपणींहि अर्जुनासारख्या तरुणाला जर्जर करून टाकीत होतीं, पण सध्यां म्हातारपण आहे कोठें? सर्वसाधारण मृत्यूचें मान सध्यां छत्तीस वर्षांवर येऊन ठेपलें आहे, तरी लोकांचे डोळे उघडत नाहींत, यापेक्षां दुसरें आश्चर्य तें कोणतें! सृष्टीच्या आरंभीं—

**स ब्रह्मचर्यमचरत् ॥ गोपथ० पू० १**

"ब्रह्मयानेंहि ब्रह्मचर्यव्रत धारण केलें होतें." ब्रह्मचर्य आश्रमाचा स्वीकार करून—

**अग्निवायुरविभ्यस्तु त्रयं ब्रह्म सनातनम् ॥**
**दुदोह यज्ञसिध्यर्थमृग्यजुःसामलक्षणम् ॥३२॥ म० अ० १**

"अग्नि, वायु व रवि या तीन ऋषींकडून सनातन, अर्थात् अपौरुषेय वेदांचें अध्ययन केलें. तेच हे ऋग्वेद, सामवेद, यजुर्वेद व अथर्ववेद होत." तसेंच—

**त्रयाः प्राजापत्याः प्रजापतौ पितरि ब्रह्मचर्यमूषुर्देवा मनुष्या असुराः ॥ बृहदा० उ० ७।१॥ सत्य संहिता वै देवा अनृत संहिता मनुष्याः ॥ ऐतरेय ब्रा० १।१॥**

"देव, मनुष्य व राक्षस हे ब्रह्मयाजवळ ब्रह्मचर्यव्रत धारण करून राहिले होते." "सत्यनिष्ठ लोकांनां देव, असत्यप्रिय मनुष्य व क्रूरकर्मी राक्षस होत." तसेंच—

**भृगुर्वै वारुणिः वरुणं पितरमुपससार । अधीहि भगवो ब्रह्मेति ॥ तैत्ति० उ० भृ० व० १। पिप्पलादोऽङ्गिराः सनत्कुमारश्चाथर्वाणं भगवन्तं पप्रच्छ । अथर्वशीर्षोपनिषद् ॥ अधीहि भगव इति होपससाद सनत्कुमारं नारदः ॥ छान्दो० ७।१॥**

"भृगुनें आपल्या वरूण नामक पित्याजवळ ब्रह्मविद्येचा अभ्यास केला." "पिप्पलाद ऋषीचा पुत्र अंगिरा व सनत्कुमार यांणीं अथर्वानामक ऋषिजवळ राहून विद्या मिळविली." सनत्कुमाराजवळ ब्रह्मचर्यानें राहून नारदानें अध्ययन केलें."

**त ँ हैतमुद्दालक आरुणिर्वाजसनेयाय याज्ञवल्क्याय अन्ते वासिने उक्त्वोवाच ॥ बृह० ८।३।७॥**
**उपकोसलो ह वै कामलायनः सत्यकामे जाबाले ब्रह्मचर्यमुवास ॥ छान्दो० ४।१०।१॥**

"उद्दालक ऋषीजवळ याज्ञवल्क्यानें वेदांचें अध्ययन केलें." "जाबाल ऋषीच्या आश्रमामध्यें राहून उपकोसलानें विद्या प्राप्त करून घेतली." याचप्रमाणें बृहदारण्यकामध्यें लिहिलें आहे कीं, मधुकानें याज्ञवल्क्याजवळ, मधुकापासून चूल नामक शिष्यानें, चूलापासून भागावित्तीनें, भागावित्तीपासून जाबालीनें अध्ययन केलें व जाबालीनें

आणखी पुष्कळांनां शिकविलें. तसेंच प्रश्नोपनिषदाच्या आरंभीं सुकेशा, भारद्वाज, शैब्यसत्यकाम, सौर्यायणी गार्ग्य, कौशल्य आश्वलायन, भार्गव वैदर्भि, कबंधी कात्यायन हे ऋषी पिप्प-लाद ऋषीजवळ ब्रह्मविद्या शिकण्यासाठीं जाऊन राहिले होते व ती त्यानें त्यांनां सांगितली असें लिहिलें आहे. तसेंच:—

**सोऽहं गुरुवचः कुर्वन् ॥** वा. रामा० ७६।१४॥
**महर्षेरग्निवेशस्य सकाशादहमच्युतः ॥**
**अस्त्रार्थमगमं पूर्वं धनुर्वेदचिकीर्षया ॥ ४० ॥**
**ब्रह्मचारी विनीतात्मा जटिलो बहुलाः समाः ॥**
**अवसं सुचिरं तत्र गुरुशुश्रूषणे रतः ॥ ४१ ॥**
भारत आदि. १३१.

"परशुरामानें कश्यपाजवळ अध्ययन केलें." तसेंच भीष्मपितामहाला द्रोणाचार्यानें सांगितलें कीं, "मी अस्त्रविद्या शिकण्यासाठीं अग्निवेशऋषीजवळ, ब्रह्मचर्य धारण करून, पुष्कळ वर्षेंपर्यंत राहिलों होतों."

**विविक्ते पर्वततटे पाराशर्यो महातपाः ॥**
**वेदानध्यापयामास व्यासः शिष्यान्महातपाः ॥ २६ ॥**
**सुमन्तु च महाभागं वैशंपायनमेव च ॥**
**जैमिनिं च महाप्राज्ञं पैलं चापि तपस्विनम् ॥ २७ ॥**
भारत. शां० ३२८

"पर्वताच्या एकांत अशा भव्य शिखरावर आश्रम बांधून व्यासानें सुमंतु, वैशंपायन, जैमिनी व पैल यांनां विद्या शिकविली." या ब्रह्मर्षींच्या पद्धतीप्रमाणेंच राजर्षींनींहि गुरुकुलीं राहूनच विद्याभ्यास केला आहे. पहा—

**तद्धैत ब्रह्मा प्रजापतय उवाच प्रजापतिर्मनवे मनुः प्रजाभ्यः ॥** छान्दो० ३।११।१४॥ **जनकोह वैदेहः कूर्चादुपावसर्पन्नुवाच नमस्ते याज्ञवल्क्या नुमाशाधीति ॥** बृहदा० ६।२।१॥

"प्रजापतीनें ब्रह्मदेवाकडून, मनूनें प्रजापतीकडून व मनूकडून इतरांनीं अध्ययन

केलें." "जनक राजानें उठून याज्ञवल्क्य ऋषीला (नमस्ते) नमस्कार करून, हे भगवन् मला ब्रह्मविद्या शिकवा, अशी विनंति केली."

**भिक्षोः पंचशिखस्याहं शिष्यः परमसंमतः ॥ २४ ॥**

महाभा० शां० १३२ ।

**स तेऽहं पितुराचार्यस्तव चैव परन्तप ॥ ४ ॥**

वा० रा० अयो० कां० १११

जनकराजा म्हणतो कीं, "मी पंचशिखाचा शिष्य आहें." याचप्रमाणें जनक अष्टवक्राकडूनहि कांहीं विद्या शिकला होता असा आधार मिळतो. तसेंच रामायणांत वसिष्ठ म्हणतो कीं, "हे रामा मी तुझा व तुझ्या पित्याचाहि गुरु आहें." "विश्वामित्राकडूनें रामानें बला व अतिबला या दोन विद्या संपादन केल्या होत्या" (वा. रा. बाल० २२।२२) "श्रीकृष्ण संदीपन नामक गुरुजवळ अवंतीका (उज्जैन) नगरींत राहून विद्याभ्यास करीत होता" असें भारत, हरिवंश व भागवत (दश. पू० आ. ४५।३१) यांमध्यें लिहिलें आहे. तसेंच "घोरा-अंगिरस नामक ऋषीजवळही कांहीं काळ राहून श्रीकृष्णानें विद्याध्ययन केलें (छांदो० ३।१७) होतें" तसेंच "शुक्राचार्य व बृहस्पती यांच्याकडून राजनीति व इतर शास्त्रें यांचें अध्ययन भीष्माचार्यानें केलें. त्याचप्रमाणें च्यवनभार्गव व वसिष्ठ ऋषी यांच्याकडून त्याणें सांग वेदांचें अध्ययन केलें व मार्कंडेयाकडून वेदांतशास्त्र व परशुराम व इंद्र यांच्याकडून युद्धविद्या यांचें अध्ययन भीष्मानें केलें. (भारत. शां. ३६) तसेंच—

**पांचाल्यो राजपुत्रश्च यज्ञसेनो महाबलः ॥**
**इष्वस्त्रहेतोर्न्यवसत्तस्मिन्नेव गुरौ प्रभुः ॥ ४२ ॥**

भार० आदि० १३१

"पांचालच्या राजपुत्रानें अस्त्रादिक विद्या अग्निवेशाकडूनच मिळविली." तसेंच—

**विश्रांतेऽथ गुरौ तस्मिन् पौत्रानादाय कौरवान् ॥**
**शिष्यत्वेन ददौ भीष्मो वसूनि विविधानि च ॥ २ ॥**
**गृहं च सुपरिच्छन्नं धनधान्यसमाकुलम् ॥**
**भारद्वाजाय सुप्रीतः प्रत्यपादयत प्रभुः ॥ ३ ॥**

**राजपुत्रास्तथा चान्ये समेत्य भरतर्षभ ॥**
**अभिजग्मुस्ततो द्रोणमस्त्रार्थे द्विजसत्तमः ॥ १० ॥**
**वृष्णयश्चान्धकाश्चैव नानादेशाश्च पार्थिवाः ॥**
**सूतपुत्रश्च राधेयो गुरुं द्रोणमियात्तदा ॥ ११ ॥**

भार० शां० १२२

"भीष्माचार्यानें कौरव पांडवांच्या शिकण्याची व्यवस्था एका सर्व साधनांनीं व उपकरणांनीं युक्त अशा वाड्यांत केली होती व त्यांनां शिकविण्यास द्रोणाचार्यास नेमलें होतें. या राजकुमारशाळेचा वृत्तांत ऐकून अन्य देशींचे अनेक राजपुत्र तेथेंच विद्याभ्यासासाठीं आले. वृष्णी व अंधक हेहि राजपुत्र तेथेंच विद्याध्ययनार्थ आले होते. या सर्वांची खाण्यापिण्याची व राहण्याची सोय भीष्माचार्यानें तेथेंच (धनधान्यसमाकुलम्) धनधान्य यांची व्यवस्था करून केली होती." अर्थात् सर्व खर्च राजाकडूनच चालविला जात होता. छात्रनिवासालय (बोर्डिंग हाउस,) पाठशाला इत्यादिकांची व्यवस्था व कल्पना पूर्वींहि होती असें पुष्कळ आधारांवरून म्हणावें लागतें. पूर्वींचे लोक विद्या शिकविणें हें आपलें कर्तव्य असें समजत असत, सध्यांप्रमाणें पैशासाठीं अडून बसत नसत. पहा—

**साक्षात्कृतधर्माण ऋषयो बभूवुस्ते अवरेभ्योऽसाक्षात्कृतधर्मभ्य उपदेशेन मन्त्रान्सम्प्रादुः**

निरु० पू० १।६।५॥

"ज्यांणीं सर्व विद्या शिकून त्यांचा अनुभवहि पाहिला आहे ते न शिकलेल्यांनां विद्या शिकवीत असत." हाच क्रम सध्यां चालू ठेवला पाहिजे. जें आपल्याला येतें तें मोकळ्या मनानें दुसऱ्यास सांगण्याचा निश्चय विद्वानांनीं केला पाहिजे. पूर्वकालीं गरीब विद्यार्थ्यांनां राजाची मदतहि मिळत असे. पहा—

**बालदायादिकं रिक्थं तावद्राजानुपालयेत् ॥**
**यावत्स स्यात् समावृत्तो यावच्चातीतशैशवः ॥ २७ ॥**

मनु. अ० ८

"आईबाप नसलेल्या बालकाची सर्व मालमत्ता, तो गुरुकुलांतून परत येईपर्यंत, राजानें संभाळावी व तो विद्या शिकून आल्यावर त्याची त्याला व्यवस्थितपणानें द्यावी.

आईबाप नसलेल्या विद्यार्थ्यांचीहि ज्या कालांत इतकी काळजी घेतली जात असे, त्या काळीं साधारण सुस्थितींत असलेल्या बालकांची व्यवस्था कशी होत असेल हें निराळें सांगणें नको. पूर्वींचीं विद्यालयें गावांत नसत; तीं उंच पर्वतावर, नदीतीरीं, तलावाजवळ किंवा अरण्यांत शुद्ध वायूच्या प्रदेशीं असत. गांवांतील रोगट हवा व दुष्ट मनुष्यांचा संसर्ग यामुळें मुलांचें शरीर व मन बिघडतें. यास्तव पूर्वी पाठशाला गांवाबाहेर एकांत जागीं स्थापीत असत व विद्यार्थ्यांनीं तेथेंच राहिलें पाहिजे असा निर्बंध असे. विशिष्ट कामासाठीं दिवसा गांवांत विद्यार्थी येत असत, पण—

**मुंडोवा जटिलो वा स्यादथवा स्याच्छिखाजटः ॥**
**नैनं ग्रामेऽभिनिम्लोचेत् सूर्यो नाभ्युदयात् क्वचित् ॥**
मनु. २।२१९ ॥

"कोणत्याहि विद्यार्थ्यानें सूर्योदयापूर्वी व सूर्यास्तानंतर अर्थात् रात्रौ गांवांत येतां नये." असा सक्तीचा नियम असे. या सर्व नियमांची सध्यां अत्यंत अवश्यकता आहे. कित्येकांची अशी समजूत आहे कीं, पूर्वी विद्यार्थी लोकांनां माधुकरी मागून खावी लागत असे व सर्वच माधुकरी मागत असत. पण हा समज चुकीचा आहे कारण, श्रीकृष्ण, रामचंद्र, मनु, परशुराम, जनक, याज्ञवल्क्य, सुकेशा, कौरव व पांडव, यादव व इतर पुष्कळ राजपुत्र व ऋषिपुत्र यांणीं गुरुकुलवास केला पण तेथें परान्न घेतलें नाहीं. यांणीं मधुकरी मागितली अशाबद्दल कोठेंहि पुरावा नाहीं. इतकेंच नव्हे तर वरील भारतांतील उताऱ्यांत सर्व राजपुत्रांच्या जेवणाची व्यवस्था भीष्माचार्यांनेंच लावली होती असें स्पष्ट म्हटलें आहे. यावरून उघड होतें कीं, धनसंपन्न व समर्थ पुरुषांचीं मुलें गुरुकुलांत स्वतःच्या खर्चानें राहत असत. स्मृतिकारांनीं सांगितलेली मधुकरीवृत्ति गरीबांसाठीं आहे. पुष्कळ गरीबांनां राजाचें सहाय्य मिळत असे व प्रायः ऋषिआश्रमांला बहुत प्रकारची मदत राजाकडूनच होत असे. आश्रमाला मदत करणें हें राजाचें एक कर्तव्य असें व ऋषीलोक जरूरीच्या वेळीं राजाकडून हवी ती मदत घेत असत पण ज्या कोणांला अशा तऱ्हेची मदत मिळण्याचा संभव नसे त्यांणीं मधुकरीचा आश्रय करून विद्या शिकावी; **कोणीहि अविद्वान् राहूं नये.** यासाठीं स्मृतिकारांनीं मधुकरीवृत्ति लिहिली आहे. सामर्थ्य असतां जो भिक्षा मागून खातो त्याची पूर्वी निंदाच होत असे पहा.—

**अथ यदात्मानं दरिद्रीकृत्यैव अह्रीभूत्वा भिक्षेत य एवास्य मृत्यौ पादस्तमेव तेन परिक्रीणाति ॥**
शत. ब्रा० ११।२।३।५॥

"जो ब्रह्मचारी सामर्थ्य असतांहि निर्लज्जपणानें भिक्षा मागन खातो तो जिवंत असून मेलाच असें समजावें." याप्रमाणें सामर्थ्य असून भिक्षा मागणें हें वाईट व तें कोणी करूं नये असें शतपथांमध्यें सांगितलें आहे. यावरूनहि उघड दिसतें कीं, सुस्थितींतील विद्यार्थी लोकांची जेवणाखाणाची व्यवस्था त्यांच्या घराकडून केली जात असे कारण, ते लोक परान्न सेवन करणें हें फार वाईट असें समजत. शुद्ध वायूच्या प्रदेशांत, गांवापासून दूर अंतरावर असलेल्या आश्रमांत विद्यार्थी आनंदानें राहत, पहा.—

**नित्यानध्याय एव स्यात् ग्रामेषु नगरेषु च॥ धर्मनैपुण्यकामानां पूतिगन्धे च सर्वदा ॥ १०७ ॥ मनु० ४**
**अधीयीत शुचौ देशे ब्रह्मचारी समाहितः ॥ औशनसस्मृति ३**
**शुचौ ॥ २१ ॥ शुक्लयजु० प्राति० १**

"नगरामध्यें व गांवामध्यें ; दुर्गंध, अशुद्ध हवा वगैरे अनेक अडचणी असतात व त्यांमुळें एकसारखें एक चित्तानें अध्ययन होत नाहीं" "म्हणून शुद्ध स्थळींच विद्यार्थ्यांनीं अध्ययन केलें पाहिजे." घरामध्यें जी जागा जास्त स्वच्छ असेल तेथें विद्यार्थ्यानें अभ्यास करण्यास बसावें. त्याचप्रमाणें पाठशाला व विश्वविद्यालयें हीं उत्तम हवाशीर व एकान्त जागीं बांधलेलीं असावीं. बालकाचा विद्यारंभ मानसिक व शारीरिक अपाय न होईल अशा वेळींच झाला पाहिजे—

**नानुपसन्नायानिदं विदे० ॥ निरु० पू० २।१।६॥**

"स्वतः शिकावयास जाण्यास जोंपर्यंत बालक शरीरानें योग्य झाला नाहीं, तोंपर्यंत त्याला शिकवूं नये." अर्थात् विद्येचा आरंभ अगदीं लहानपणीं करूं नये. अगदीं लहानपणीं कोंवळ्या मेंदूला त्रास दिला असतां, त्याची वाढ खुंटून बालकाच्या शरीराला व मनाला अपाय होतो. "किमिदं?" "हें काय आहे" असें ज्ञान होईपर्यंत तर त्याला शिकवूंच नये. तसेंच—

**वयः शीलशौर्यशौचाचारविनयशक्तिबलमेधाधृतिस्मृतिमतिप्रतिपत्तियुक्तम् ॥ सुश्रु० सू० २ ॥**
**शक्तिमन्तं चैनं ज्ञात्वा यथावर्णं विद्यां ग्राहयेत् ॥**
**सुश्रु० शा० १० ॥**

धन्वन्तरीनें सांगितलें आहे कीं, "जेव्हां बालक; शील, शौर्य, शुद्धता, आचार,

विनय, शारीरिक बल, बुद्धि, धैर्य, स्मरण, विचारशक्ति, ज्ञानग्रहणशक्ति या गुणांनीं युक्त होऊं लागला असें वाटेल तेव्हांच त्याला शिकविण्यास सुरुवात करावी." "शिकविण्यास योग्य अशी शरीरांत शक्ति आली म्हणजे मुलाला शिकवावा." आचारांतील फरक व स्वच्छास्वच्छता यांतील भेदहि ज्याला कळत नाहींत इतक्या लहान वयांत मुलाला कधींहि शिकवूं नये. ज्ञान हें जीवन आहे. जसें पाण्यानें झाड वाढतें, तद्वत् ज्ञानानें आत्मा सुसंस्कृत होतो. पण जर लहान झाडाला अतोनात पाणी घातलें तर तें कुजून नाश पावतें तद्वतच अगदीं लहानपणीं शिक्षणाचा बोजा बालकावर पाडला असतां, त्याची मननशक्ति नष्ट होते. कोंवळ्या बुद्धीवर विद्येचा जास्त भार घातल्यानें शरीरहि क्षीण होतें, मननशक्ति नष्ट होते, आयुष्य कमी होतें व आरोग्य नाहींसें होतें. यासाठींच महर्षींनीं विद्याभ्यासाचा आरंभ अगदीं लहानपणीं करूं नये म्हणून सांगितलें आहे. याप्रमाणें वयाच्या इयत्तेविषयीं झालें. आतां कोणी काय काय शिकावें तें पाहिलें पाहिजे. सध्यां कोणी म्हणतात कीं, ब्राह्मणांनांच अध्ययनाचा व विशेषतः वेदाचा अधिकार आहे व इतरांनां तो नाहीं. इतरांनीं वेदाक्षर ऐकूंहि नये पण सूक्ष्म विचारांतीं ती चूक आहे असें दिसतें कारण,--

**आथर्वणस्य वेदस्य शेष इत्युपदिशन्ति ॥ १२ ॥**
आपस्तंब० ध० सू० ११।२९ ॥

**या च नार्यपच्यवमुपच्यवं च शिक्षते ॥४॥** अ० १।२।२७ ॥
**यत्र यस्मिन् कर्मणि नारी पत्नी अपच्यवं शालाया निर्गमनं उपच्यवं शालाप्राप्तिं शिक्षते अभ्यासं करोति । शिक्ष विद्योपादाने ॥ सायणभाष्ये ॥**

"ज्या कर्मामध्यें पत्नी शाळेप्रत जाऊन विद्येची प्राप्ति करून घेते" या आधारामध्यें ............स्त्रियांनांहि अध्ययन सांगितलें आहे. पूर्वी स्त्रियांनांहि वेदाध्ययन व ब्रह्मचर्य विहित होतें. याविषयीं काय काय आधार मिळतात ते पाहूं:--

**यथे॒मां वाचं॑ कल्या॒णीमा॒वदा॑नि॒ जने॑भ्यः ॥
ब्र॒ह्म॒रा॒ज॒न्या॒भ्या॑ᳪ शू॒द्राय॒ चार्या॑य च॒ स्वाय॒ चार॑णाय ॥** यजु० २६।२

परमात्मा उपदेश करतो कीं. "हे विद्वान् लोक हो! ज्याप्रमाणें ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, शूद्र व इतर यांच्यासाठीं मी वेदांचा उपदेश केला तसा तुम्हींहि करा. वैदिक ज्ञानाचा प्रसार करा व तो करण्यांत पक्षपात करूं नका." तसेंच—

**ब्रह्म वै स्तोमानां त्रिवृत् क्षत्रं पञ्चदशो विशः सप्तदश शौद्रोवर्ण एकविंश ॥ ४ ॥ ऐतरेय० ८।१॥**

ऐतरेय ब्राह्मणांत अग्निष्टोम प्रकरणांत लिहिलें आहे कीं, "ब्राह्मणानें नऊ, क्षत्रियानें पंधरा, वैश्यानें सत्रा, व शूद्रानें एकवीस अग्निष्टोम करावें." निरु० पू० ३।२ मध्यें स्तोम शब्दाचा अर्थ "वेद" असा दिला आहे व "यज्ञ" हा त्याचा अर्थ प्रसिद्धच आहे. तेव्हां वरील उताऱ्यावरून शूद्रालाहि वेद शिकण्याचा व यज्ञ करण्याचा अधिकार आलाच. छान्दोग्य उपनिषदामध्यें (छां. प्र. ४।२) "**हीरेत्वाशूद्र**" इत्यादि वाक्यांमध्यें सांगितलें आहे कीं, "रयिक्व महर्षीनें जानश्रुति नामक शूद्राला वेद शिकविले," तसेंच (छां० ४।४ मध्यें) "अज्ञातकुल जाबालीला गौतम ऋषीनें वेद शिकविले." तसेंच कवष ऐलुष नांव व योग्यता मिळविणारा ऋषि शूद्र कुलांत उत्पन्न होऊनहि मंत्रद्रष्टा झाला. (पहा ऋग्वेद मं. १० अ. ३ सू. ३०।३४) हा ऋषि शूद्रकुलोत्पन्न असल्याबद्दल ऐतरेय ब्राह्मण (पं० २।३) मध्यें व कौशीतकीय ब्राह्मण (१२।३) मध्यें लिहिलें आहे. तसेंच ऋग्वेद मं. १ अ. १७ सू. ११६ ते १२६ या मंत्रांचा द्रष्टा, या नांवाच्या योग्यतेला कक्षीवान् हा पावला होता. हा अंगदेशाच्या राजाच्या दासीचा मुलगा होता. असें ऋग्वेदानुक्रमणिका, एतत्सूत्रस्थ सायणभाष्य व महाभारत यांमध्यें लिहिलें आहे. अशीं शेंकडों उदाहरणें काढून देतां येतील. अशीं उदाहरणें विद्यमान असतांहि शूद्रांनां वेदाक्षर ऐकण्याचा अधिकार नाहीं असें म्हणणारांचें आश्चर्य करावें तेवढें थोडेंच. रामानुज व माध्व यांनीं तर "**शूद्रांनीं वेदाक्षर ऐकलें असतां, त्यांच्या कानांत शिसें तापवून ओतावें व त्यांणीं वेदाचा उच्चार केला असतां, त्यांची जिव्हा छेदून टाकावी**" असें लिहिलें आहे. हा धर्माच्या नांवाखालीं केवढा अन्याय! पहा.

**एहीति ब्राह्मणस्यागह्याद्रवेति वैश्यस्य च राजन्यबन्धोश्चाधावेति शूद्रस्य ॥ शत० ब्रा०१।१।१।४।१९॥ हविष्कृदेहीति ब्राह्मणस्य हविष्कृदागहीति राजन्यस्य हविष्कृदाद्रवेति वैश्यस्य हविष्कृदाधावेति शूद्रस्य प्रथमं वाव सर्वेषाम् ॥** आपस्तं. श्रौ. सू. १।१९॥

" एहीति, आगहि, आद्रवेति, आधावेति " हे चार पृथक् मंत्र ब्राह्मण, क्षत्रिय वैश्य व शूद्र यांनीं म्हणावें. इ०

या उताऱ्यांत " चारहि वर्णांनीं पृथक् पृथक् मंत्रांच्या योगानें हवनीय द्रव्यें शुद्ध करावींत." असें सांगितलें आहे. तसेंच—

**आचान्तोदकाय गौरिति नापितस्त्री ब्रूयात् ॥ १८ ॥**
**मुंच गां वरुणपाशात् ॥ १९ ॥ गोभि० सू० प्र० ४ ॥**

टीका-

**तमेवनापितं मुञ्चगामिति मन्त्रं ब्रूयात् ।**

" पूर्वोक्त मंत्र नापित व नापितस्त्री यांनांहि ( बोलण्याचा ) अधिकार आहे," असें वरील उताऱ्यावरून ठरतें. तसेंच—

**तयैवावृता निषादस्थपतिं याजयेत् ॥ १२ ॥**
**आ० श्रौ० प्र० ९।१४**

" पूर्वोक्त यज्ञ निषादाकडूनहि करवावा." तसेंच सांख्यायनसूत्रांत—

**गायत्रछन्दसो ब्राह्मणाः ॥ ९ ॥ त्रिष्टुबूछन्दसः क्षत्रियाः ॥ १२ ॥ जगतीछन्दसो विशः ॥ १९ ॥ अनुष्टुब् छन्दसः शूद्राः ॥ १९ ॥ सां० सू० अ० १४ ॥**

" ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य व शूद्र यांणीं अनुक्रमें गायत्री, त्रिष्टुब्, जगती व अनुष्टुब् यां छंदांत असलेल्या मंत्रांनीं यज्ञ करावा." तसेंच—

**फलार्थत्वात् कर्मणः शास्त्रं सर्वाधिकारं स्यात् ॥ ४ ॥**
**पू० मीमां० अ० ६।१॥**

" शास्त्रांवर सर्वांचा अधिकार आहे कारण, सर्वांनीं कर्मे करून उत्तम फळांचा लाभ करून घ्यावा " यासाठींच शास्त्रांची प्रवृत्ति आहे. जे आळसाचा अवलंब करून अध्ययन न करतील तो त्यांचा दोष समजावा.

**कर्तुर्वा श्रुतिसंयोगाद्विधिः कार्त्स्न्येन गम्यते ॥ ५ ॥**
**पू० मीमां० अ० ६।१॥**

" वेदाध्ययन व यज्ञादिक कर्म करण्यास जो समर्थ असेल त्याला श्रुतिसंयोगानें उक्त कर्म करण्याचा अधिकार आहे." तसेंच—

**स्थपतिर्निषादः स्यात् शब्दसामर्थ्यात् ॥ ५१ ॥**

पू० मीमां० ६।१।

"(वैदिक) शब्दसामर्थ्यावरून निषादानेंहि रौद्र याग करावा" असें ठरतें. याज्ञिक कर्म करण्यास वेदज्ञानाची व वेदाध्ययनाची अवश्यकता आहे व ज्याला ज्याला यज्ञ करण्याचा अधिकार असेल त्याला त्याला वेदाध्ययनाचा अधिकार पाहिजेच. पहा—

**ज्ञाते च वाचनं न ह्यविद्वान् विहितोऽस्ति ॥ १८ ॥**

पू० मीमां० ३।८ ॥

वेदाध्ययन केलेल्यालाच याज्ञिक कर्म करण्याचा अधिकार आहे. निषादाला यज्ञाचा अधिकार यजु० २६ मं० १९ मध्यें महीधर भाष्यामध्यें स्पष्ट लिहिलेला आहे. तसेंच निरु. पू० ३।२।२ मध्येंहि स्पष्ट आहे. तसेंच—

**पठन् द्विजो वागृषभत्वमीयात्**
**स्यात् क्षत्रियो भूमिपतित्वमीयात् ॥**
**वणिग्जनः पण्यफलत्वमीयात्**
**जनश्च शूद्रोपि महत्वमीयात् ॥ १०१ ॥**

बालकांड वाल्मी० रा. स. १

"रामायणाचें अध्ययन केल्यानें ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य व शूद्र यांनां फारच लाभ होतो." म्हणून तें सर्वांनीं शिकावें. कोणींहि आशिक्षित राहूं नये व सर्वांनीं विद्या शिकावी याविषयीं :—

**यथामति यथापाठं तथा विद्या फलिष्यति ॥**
**सर्वस्तरतु दुर्गाणि सर्वो भद्राणि पश्यतु ॥ ४८ ॥**
**श्रावयेच्चतुरो वर्णान् कृत्वा ब्राह्मणमग्रतः ॥**
**वेदस्याध्ययनं हीदं तच्च कार्य्यं महत्स्मृतम् ॥ ४९ ॥**

भारत. शां. प. ३२८ ॥

"जसें विद्येचें अध्ययन केलें असेल तशी ती फलद्रुप होईल. म्हणून सर्वांनीं विद्या शिकून व दुःखांतून पार पडावें व कल्याण संपादन करावें. वेदर्षि ब्राह्मणाकडून चारहि वर्णींनीं वेद अर्थज्ञानपूर्वक ऐकावे. वेदाध्ययन हें फार महत्वाचें कार्य आहे.

चत्वारो वर्णा यज्ञमिमं वहन्ति ॥ ११ ॥ भार० वन० १३४ ॥

नीलकंठी टीका-यज्ञे ज्ञानयज्ञे शूद्रस्यापि अधिकारः ।

ज्ञानयज्ञ चारहि वर्णांनीं करावा. ज्ञानयज्ञ करण्याचा शूद्रालाहि अधिकार आहे. तसेंच.

ब्राह्मणः क्षत्रियो वैश्यः शूद्रो वा चरितव्रतः
गायत्रीं मम वा देवीं सावित्रीं वा जपेत् ततः ॥

वृद्ध गौतमस्मृ० अ० १६.

स्वाहाकारः नमस्कारमन्त्रः शूद्रे विधीयते इति भारते ।

संस्कार मयूख १।२

अनुज्ञातोऽस्य नमस्कारो मन्त्रः पाकयज्ञैः स्वयं यजेत ।

गौतमस्मृति अ० १०.

नमस्कारेण मन्त्रेण पञ्चयज्ञान्न हापयेत् ॥

याज्ञवल्क्यस्मृ० १२१ ।

बलिकर्मस्वधाहोमस्वाध्यायातिथिसत्क्रियाः ॥
भूतपित्र्यमरब्रह्ममनुष्याणां महामखाः ॥

याज्ञव० स्मृ० १०२ आचारा० ९

"ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य व सदाचरणी शूद्र यांणीं गायत्रीचा जप करावा." "स्वाहाकार व नमस्कार मंत्र हे उच्चारण्यास शूद्रासहि अधिकार आहे." "नमस्कार मंत्रानेंहि पंचमहायज्ञ करावे." "बलि वैश्वदेव, पितृयज्ञ, हवन, वेदाध्ययन व अतिथिसत्क्रिया हेच ते पंचमहायज्ञ होत." तसेंच—

विद्यार्थं ब्रह्मचारी स्यात् सर्वेषां पालने गृही ॥ २ ॥

शुक्रनीति. ४।४ ॥

"विद्याध्ययन करण्यासाठीं चारहि वर्णांनीं ब्रह्मचर्य धारण करावें व सर्व मनुष्यांच्या पालनासाठीं गृहस्थाश्रम स्वीकारावा." येथें कोणी असें म्हणतील कीं, उपनयन केल्यावर वेद शिकण्याचा अधिकार प्राप्त होतो व शूद्राला उपनयनाचा अधिकार नसल्यामुळें त्याला वेद कसा शिकतां येईल? याला उत्तर असें—

**शूद्राणामदुष्टकर्माणामुपनयनम् ॥ १ ॥**

पारस्कर गृह्यसूक्त० कां० २।

**शूद्राणां ब्रह्मचर्यत्वं मुनिभिः कैश्चिदिष्यते ॥ १६ ॥**

याज्ञवल्क्य० योग० अ० २

"सदाचरणी शूद्रांनां उपनयन करण्याचा अधिकार आहे." व तसेंच "कित्येक मुनी म्हणतात कीं, शूद्रांनीं ब्रह्मचर्य व्रतहि धारण करावें." तसेंच जसा दुष्टकर्म करणाऱ्या शूद्राला उपनयनाचा अधिकार नाहीं तद्वतच दुराचारी ब्राह्मणालाहि उपनयनाचा अधिकार नाहीं ( पहा. आपस्तंब सू० १।१।५ ) याप्रमाणें पूर्वीं विद्या प्रसाराबद्दल आज्ञा [१]होती. तसेंच—

**ब्रह्मचर्येण कन्या३ युवानं विंदते पतिम्॥१८॥**

अथर्व० ११।३।१९.

"ब्रह्मचर्यव्रत समाप्तीनंतर कन्येला तरुण पति मिळतो" या अथर्ववेद मंत्रावरून कन्यांनांहि ब्रह्मचर्य विहित आहे असें होतें.

**समानं ब्रह्मचर्यम् ॥ २४ ॥ अपस्तं. सू. ४।१९॥**

स्त्री व पुरुष यांनीं "एकसारखेंच ब्रह्मचर्यव्रत धारण करावें." ही आज्ञा वेदांच्या आधारांवरून आहे. जसें ऋग्वेद मं. १।२३।१७९ ) या सूक्ताची मंत्रद्रष्टी लोपामुद्रा व ( ऋ० ८।९।९१ ) या सूक्ताची अपाला ही सूक्तप्रचारिका या स्त्रीया होऊन गेलेल्या आहेत. ( पहा ऋग्वेदानुक्रमणिका व सायणभाष्य. ) तसेंच—

**अथ हैनं गार्गी वाचक्नवी पप्रच्छ याज्ञवल्क्येति होवाच ........गार्गी मातिप्राक्षीरिति ततोह गार्गी वाचन्कव्युपरराम ॥ १ ॥ बृहदा० ९।६**

---

( १ ) येथवर दिलेल्या आधारांवरून शूद्राला उपनयन संस्कार व वेदाध्ययन वगैरेंचा अधिकार आहे असें ठरतें खरें पण त्यांत "चरितव्रतः" हें पद सर्वांनीं लक्ष्यांत ठेवण्यासारखें आहे. वरील वचनांचा "पाहिजे त्याणें हवें तेव्हां उपनयन करावें व वेद वैदिक पद्धतीप्रमाणें शिकावे" असा अर्थ नाहीं. ब्राह्मण, क्षत्रिय व वैश्य यांच्या कुलांत उत्पन्न होणाऱ्यांनां उपनयनाचा उपजत अधिकार प्राप्त झालेला असतो व शूद्रादिक जातींत उत्पन्न झालेल्यांनां विशेष प्रकारचें आचरण पूर्वी करून तो अधिकार आणतां येतो. हाच भेद "चरितव्रतः" या पदानें दाखविला आहे. याविषयींचा विशेष खुलासा स्वतंत्र रीतीनें करण्यांत येईल.

"गार्गीनें याज्ञवल्क्य ऋषीला प्रश्न विचारले, ( त्यांचीं उत्तरें त्याणें दिलीं व शेवटीं तो म्हणाला कीं, ) हे गार्गी ! आतां प्रश्न पुरे कर. हें ऐकून ती स्वस्थ बसली." याज्ञवल्क्यासारख्या ऋषीलाहि उत्तर देण्यास कठीण गेलें अशा पूर्वपक्ष करणाऱ्या स्त्रिया पूर्वी होत्या. यावरून तत्कालीन स्त्रियांच्या शिक्षणाची कल्पना होणार आहे. तसेंच—

**अथ य इच्छेत् दुहिता मे पण्डिता जायेत सर्व-मायुरीयात् इति तिलौदनं पाचयित्वा सर्पिष्मन्तमश्नीयातामीश्वरौ जनयीतवै ॥ १७ ॥ बृह० उ० ८।४॥**

"ज्या स्त्रीपुरुषांनां आपली मुलगी पंडिता व्हावी अशी इच्छा असेल त्यांणीं तिल व तांदूळ शिजवून ते तुपाबरोबर खावे इ०" याप्रमाणें कन्यांनीं ब्रह्मचर्य करावें यास आधार आहेत. तसेंच—

**पाणिग्रहणादिगृह्यं परिचरेत् स्वयं पत्न्यपि वा पुत्रः कुमार्यन्तेवासी वा ॥ आश्व० गृ० १।९।१॥**

"गृह्याग्नीचें सेवन; पुरुष, स्त्री, पुत्र, पुत्री किंवा शिष्य यांपैकीं कोणी तरी अवश्य करावें."

**पत्न्या अपि मन्त्रपाठो भवत्येव । टीका श्रौतसू० २६७ ॥**

**कामं गृह्येग्नौ पत्नी जुहुयात् सायं प्रातर्होमौ गृहपत्नी गृह्य एषोऽग्निर्भवति ॥ १५ ॥ गोभिल० १।३॥**

**अग्नये स्वाहेति सायं जुहुयात् सूर्याय स्वाहेति प्रातस्तूष्णीं द्वितीये उभयत्र ॥ ८ ॥ आश्व. गृ० १।९॥**

"यज्ञामध्यें स्त्रियांनींहि मंत्र म्हणावें." "गृह्याग्नीमध्यें स्त्रियांनींहि हवन करावें." "संध्याकाळीं **अग्नये स्वाहा** व सकाळीं **सूर्याय स्वाहा** हा मंत्र म्हणावा." वरील गोभिल सूत्रांत "**पत्नी जुहुयात्**" अशीं पदें आहेत त्यावर टीकाकारांनीं "**पत्नीमध्यापयेत् कस्मात् पत्नी जुहुयादिति वचनात्।**" पत्नीला वेदमंत्र व हवन करण्याची पद्धति शिकवावी, असें लिहिलें आहे. तसेंच—

**यच्चाम्नायो विदध्यात् ॥ १२ ॥ गोभिल० गृ० १।६॥**

या सूत्रांत "स्त्रियांनांहि वेदाध्ययनाचा अधिकार आहे" असें ध्वनित केलें आहे. पण सध्यां त्यांनां अनधीत ठेवण्यांतच भूषण मानलें जातें.

प्रावृतां यज्ञोपवीतिनीमभ्युदानयन् जपेत् सोमोऽददत् गन्धर्वायेति ॥ १९ ॥ गोभिल० २।१॥

स्त्रिय उपनीता अनुपनीताश्च ॥ पारस्करगृह्य०

विवाह करण्यासाठीं "विवाहशालेंत उत्तम वस्त्रें धारण करणाऱ्या व यज्ञोपवीत धारण केलेल्या वधूला आणावें. इ०" "स्त्रियांचें उपनयन करावें किंवा करूं नये." असें पारस्कर सूत्रांत आहे.

द्विविधाः स्त्रियो ब्रह्मवादिन्यः सद्यो वध्वश्च। तत्र ब्रह्मवादिनीनामुपनयनमग्नीन्धनं वेदाध्ययनं स्वगृहे भिक्षाचर्या इति वधूनां तूपस्थिते विवाहे कथंचिदुपनयनमात्रं कृत्वा विवाहः कार्यः ॥ इति हारीतेनोक्तम् ॥ तथा—

पुराकल्पे कुमारीणां मौञ्जीबन्धनमिष्यते ॥ अध्यापनं च वेदानां सावित्रीवचनं तथा ॥ १ ॥ पिता पितृव्यो भ्राता वा नैनामध्यापयेत् परः ॥ स्वगृहे चैव कन्याया भैक्ष्यचर्या विधीयते ॥ २ ॥ यमस्मृति. पराशरमाधवीय.

पूर्वी मुलींचेंहि उपनयन करीत, त्यांनां वेद शिकवीत व गायत्रीचा उपदेश करीत असत स्त्रियांनां पिता, चुलता किंवा भाऊ यांच्याकडूनच शिकविण्याची व्यवस्था केली जाई व त्यांचें जेवण स्वगृहींच होत असे. दुसरे शिक्षक ठेवण्याची मनाई होती." कित्येकांच्या मतें "स्त्रियांचे दोन प्रकार आहेत. ज्यांनां अध्ययनांत आयुष्य घालवावयाचें असेल त्यांचें उपनयन करावें व त्यांनां वेद शिकवावे व इतरांचा विवाहाच्या वेळीं उपनयन संस्कार करून एकदम विवाह करावा."—

ध्रुवमसि ध्रुवाहं पतिकुले भूयासममुष्यासाविति पतिनाम गृह्णीयात् आत्मनश्च ॥ ९ ॥ गोभिल० २।३॥

पत्नी च ॥ लाठ्यायन श्रौ० सू० १।६।४ ॥

"कुमारीनें "ध्रुवाहं" या मंत्राचें उच्चारण करावें व ईशप्रार्थना करावी कीं, आपण पतिगृहीं निर्विघ्नतापूर्वक राहूं. इ०" "पत्नीनेंहि सामगायन करावें."

स्त्रियोऽपि मन्त्रेण तमारुह्य० ॥ पारस्कर गृ० ॥
घृतवन्तं कुलायिनं रायस्पोषं सहस्रिणं वेदो दधातु
वाजिनं इति वेदे पत्नीं वाचयति ॥ १३ ॥
सांख्यायन श्रौ० ११९॥

"घृतंवंतं" इत्यादि अनेक मंत्र स्त्रीनें वाचावे. याप्रमाणें वेदांचा स्त्रियांनांहि अधिकार आहे. तसेंच—

पत्नी पन्नेजनीर्गृह्णाति प्रत्यङ् तिष्ठन्ती वसुभ्यो रुद्रेभ्य
आदित्येभ्य इति ॥ १२ ॥ आपस्तंब सू० १२।१ ॥

"यज्ञामध्यें पत्नीनें पश्चिम भागीं राहून उक्त मंत्र म्हणावे." तसेंच—

तस्या यावदुक्तमाशीर्ब्रह्मचर्यमतुल्यत्वात् ॥ २४ ॥
पूर्वमीमां. ६।१ ॥

"स्त्रीला आशीः व ब्रह्मचर्य यांचा अधिकार आहे." त्यांणीं वेदमन्त्रोक्त आशीर्वाद द्यावे व स्वतः विद्यापूर्तीपर्यंत ब्रह्मचर्य धारण करावें. तसेंच—

जातिं तु बादरायणोऽविशेषात् तस्मात् स्त्र्यपि प्रती-
येत जात्यर्थस्याविशिष्टत्वात् ॥ ८ ॥ पूर्वमी० ६।१ ।

"बादरायण व्यासाचें मत स्त्रियाहि मनुष्यजातींतील असल्यामुळें त्यांणीं वेदाध्ययन करावें" असें आहे. पातंजल महाभाष्यांत

आपिशलमधीते ब्राह्मणी आपिशला ब्राह्मणी । काश-
कृत्स्निना प्रोक्ता मीमांसा काशकृत्स्नी । काश कृत्स्नी-
मधीते काशकृत्स्ना ब्राह्मणी । व्या० महाभाष्य ४।१।१४ सूत्र.
उपेत्याधीयते तस्या उपाध्यायी उपाध्याया ॥
व्याकर० महाभा० ३।३।२१ सू०

"अपिशलकृत ग्रंथांचें अध्ययन करणाऱ्या स्त्रीला "आपिशला" म्हणतात व काशकृत्स्नकृत मीमांसेचें अध्ययन करणाऱ्या स्त्रीला "काशकृत्स्ना" असें म्हणतात."
अशीं शिकणाऱ्या स्त्रियांचीं नांवें दिलीं आहेत त्यावरूनहि स्त्रियांनां शास्त्राध्ययन विहित आहे असें दिसतें. तसेंच—

**साक्षौमवसना हृष्टा नित्यं व्रतपरायणा ॥ अग्निं जुहोति स्म तदा मन्त्रवत्कृत मङ्गला॥१५ ॥** वा. रामाय. अयो. स. २०

**ततः स्वस्त्ययनं कृत्वा मन्त्रविद्विजयैषिणी ॥ अन्तः पुरं सहस्त्रीभिः प्रविष्टा शोकमोहिता॥२२॥**वा. रामा. किष्किं.स.१६

"कौसल्या सुंदर रेशमी वस्त्र नेसून अग्निहोत्र करीत बसली होती" व "मंत्र जाणणाऱ्या तारेनें स्वस्त्ययन करून अंतःपुरांत प्रवेश केला" याप्रमाणें रामायणांत स्त्रिया वेदवेत्त्या होत्या असें लिहिलें आहे. तसेंच ज्यावेळीं सुलभानामक नैष्ठिक ब्रह्मचारिणी स्त्री जनकाच्या राजसभेंत आली, तेव्हां तिला जनकानें प्रश्न विचारला असतां, ती म्हणतेः—

**साहं तस्मिन्कुले जाता भर्तर्य्यसति मद्विधे ॥ विनीता मोक्षधर्मेषु चराम्येका मुनिव्रतम् ॥८३॥** महा. शांतिप. ३२१

"विशाल क्षत्रियकुलांत मी उत्पन्न झालें, माझा विद्याभ्यास विधिपूर्वक झाला. नंतर योग्य विद्वत्तादिगुणांनीं युक्त असा माझ्या योग्य विद्वान् पति मला न मिळाल्यामुळें मोक्षधर्माच्या प्राप्तीकरितां मी हें मुनिव्रत धारण केलें आहे." याप्रमाणें योग्यवर न मिळाला असतां पूर्वींच्या विदुषी स्त्रिया धर्मपूर्वक अविवाहितहि राहत असत व अनेक विद्या शिकत. पहा—

**अभ्यास प्रयोज्यांश्च चातुःषष्टिकान् यान् कन्या रहस्येकाकिन्यभ्यसेत् ॥ १२ ॥** वात्स्यायन. सू. अ. ३.

"कुमारिकांनीं एकांतीं राहून—अर्थात् स्वजनांकडून—चौसष्ट कलांचा अभ्यास करावा." अशा कलाकुशल स्त्रिया पूर्वी असत—

**प्रिया च दर्शनीयाच पण्डिताच पतिव्रता ॥२॥**भार. वन.२७

"द्रौपदी ही विदुषी, सुंदर, सुकुमार व पतिव्रता होती" याचप्रमाणें विराट्‌राजपुत्री उत्तरा, भोजस्त्री विद्यावती व लीलावती इत्यादि अनेक विद्वान् स्त्रीरत्नें या आर्यावर्तांत होऊन गेलीं. अशा रीतीनें स्त्रियांनां ब्रह्मचर्य व विद्याध्ययन यांची अवश्यकता प्राचीन ग्रंथांत सांगितली आहे व ती युक्तिसिद्धहि आहे. जशी पुरुषांनां बुद्धि आहे तशीच स्त्रियांनांहि आहे व बुद्धीचा उपयोग ज्ञानार्जन हा आहे. यामुळें त्यांनां अध्ययन अवश्य आहे. त्यांच्या बुद्धीचा विकास न करतां त्यांनां अज्ञानांतच ठेवण्याची खटपट करणारे खरोखरच दोषी होत. ज्याप्रमाणें डोळसाला डोळे बांधून

ठेवल्यानें दु:ख होतें व त्याची उन्नति होत नाहीं तद्वतच स्त्रियांच्या बुद्धीची वाढ खुंटल्यानें होते. म्हणून सर्वांनीं आतां पक्षाभिमान सोडून विद्याध्ययन स्त्रियांनां व पुरुषांनां देण्याचा क्रम ठेवावा. सर्वांची उन्नति झाली पाहिजे व सर्वांनां ज्ञानाचा लाभ शक्य तेवढा मिळालाच पाहिजे.

ज्याप्रमाणें सध्यां स्त्रियांचा, त्याप्रमाणें शूद्रांचाहि अध्ययनाधिकार काढून घेतलेला दिसतो. याहून विशेष गोष्ट ही कीं—

**शक्तेनापिहि शूद्रेण न कार्य्यो धनसञ्चयः ॥**
**शूद्रो हि धनमासाद्य ब्राह्मणानेव बाधते ॥ १२९ ॥**

—मनु. अ. ९

"शूद्राला जास्त धनसंचय करूं देऊं नये कारण, शूद्र जर श्रीमंत झाला तर तो ब्राह्मणांनां त्रास देतो." असले श्लोकहि स्वार्थी लोकांनीं धर्मग्रंथांत घुसडून दिले व "त्या गरीब शूद्रांकडून जबरीनें धन हरण करावें" असेंहि मनसोक्त लिहिण्यास कमी केलें नाहीं. हे सर्व श्लोक प्रक्षिप्त आहेत यांत शंका नाहीं कारण, ते वेदविरुद्ध आहेत. पहा—

**सत्यमहं गंभीरः काव्येन सत्यं जातेनास्मि जातवेदाः ॥ न मे दासो नार्य्यो महित्वा व्रतं मीमाय यदहं धरिष्ये ॥ ३ ॥**

अथर्व० ५।३।११॥

**मा गृधः कस्यस्वित् धनम् ॥** यजु० ४०।१॥

"सेवक व धनी यांचा पक्षपात मी करीत नाहीं" "कोणीहि कोणाच्याहि धनाचा अपहार करूं नये." याप्रमाणें वेदांत सांगितलें आहे. याच्या विरुद्ध वरील श्लोक असल्यामुळें ते सर्व त्याज्य व अनादरणीय होत. अर्थात् आपल्या शक्तीप्रमाणें धन व विद्या संपादन करण्याचा सर्वांस अधिकार आहे. (१) वेदादिक शास्त्रें हीं कोणींहि म्हटलीं असतां सदोष होऊं शकत नाहींत हें अगदीं उघड आहे व अशीं उत्तम शास्त्रें शिकल्यानेंहि शिकणारांमध्यें दोष उद्भवणार नाहींत. (२) ज्याप्रमाणें जल, वायु, अग्निवगैरे पदार्थ परमेश्वरानें सर्वांसाठीं केले आहेत त्याचप्रमाणें वेदादिक शास्त्रेंहि त्यानें सर्वांसाठींच केलीं आहेत. (३) पशुपक्ष्यांच्या शरीरांत जशी

शास्त्रें शिकण्याची योग्यता नाहीं तद्वत् स्त्रीशूद्रांची स्थिति नाहीं. त्यांनां इतर तीनहि वर्णाप्रमाणेंच बुद्ध्यादि अवश्य साधनें आहेत. (४) स्त्री, शूद्र विद्याहीन राहिल्यानें घरांत व देशांत कलह वाढतात कारण, घरांत स्त्रिया अशिक्षित व देशांत शूद्र अशिक्षित. यांचें व सुशिक्षितांचें मतैक्य शक्य कसें होईल? म्हणून त्यांनां सुसंस्कृत करणें अवश्य आहे. (५) स्त्रीशूद्रांनां शास्त्राध्ययन करूं न देणें हा ईश्वराज्ञेचा भंग करणें आहे. कारण, परमेश्वरानें विद्या ही सर्वांसाठीं उत्पन्न केली आहे. (६) गृहकृत्य व परिचर्यादिक कृत्यांमध्येंहि स्त्रीशूद्रांनां थोड्या बहुत मानानें विद्येची अवश्यकता असतेच. (७) स्त्रिया ह्या बालकांच्या पहिल्या शिक्षकिणी असल्यामुळें त्यांनां शिक्षण देणें अवश्यक आहे. विदुषी स्त्रियांनां प्राणिधर्मशास्त्र, मानसशास्त्र, समाजसंस्थितिशास्त्र, रसायनशास्त्र, आलेख्यशास्त्र, वैद्यक, गृहकृत्य यांसंबंधानें थोडथोडी तरी माहिती अवश्य आहे कीं, जिच्यायोगानें त्या बालकांच्या कोमल अंतःकरणावर विद्येचे ठसे उमटवूं शकतील. इत्यादि अनेक कारणास्तव स्त्रीशूद्रांनां विद्यासंस्कार झालाच पाहिजे. मग ब्राह्मणांनां तर आळशी बसून चालणारच नाहीं.

प्रियो मे यो भवेन्मूर्खः स पुराद्बहिरस्तु मे ॥
कुम्भकारोऽपि यो विद्वान् स तिष्ठतु पुरे मम ॥ १ ॥

भोजप्रबंध.

" माझ्या प्रीतींतील मनुष्य जर अविद्वान् असेल तर त्याला माझ्या नगराबाहेर घालवा व कुंभार जर विद्वान् असेल तर त्याला माझ्याजवळ येऊं द्या." या प्रकारचे उदात्त विचार चहूंकडे झाले पाहिजेत व विद्याप्रियता वाढली पाहिजे. वरच्या श्लोकावरून भोजराजाच्या राज्यपद्धतीची कल्पना होऊं शकते. आतां असा प्रश्न उत्पन्न होतो कीं, "शिकवावें कोणीं?" पुरुषांनां पुरुषांनीं व स्त्रियांनां स्त्रियांनीं शिकवावें हेंच त्याचें उत्तर होय. पूर्वकाळापासूनहि अशीच व्यवस्था चालत आली आहे. चारहि वर्णांतील मनुष्यांनां जें जें येत असेल तें तें त्याणें दुसऱ्यांस शिकवावें. विद्या चोरून ठेवण्यानें अनेक प्रकारचें नुकसान होतें. म्हणून तसें कोणींहि करूं नये, पहाः—

श्रद्दधानः शुभां विद्यामाददीतावरादपि ॥
अन्त्यादपि परं धर्मं स्त्रीरत्नं दुष्कुलादपि ॥ २३८ ॥

मनु. अ. २

कोणाहि हीन जातीमध्यें उत्पन्न झालेल्या माणसाकडून धर्म व विद्या हीं मिळवावीं.

तात्पर्य ज्याला जें येतें तें त्याणें दुसऱ्याला शिकवावें व शिकणारानें जात्याभिमान् सोडून व विद्याभिरुचि बाळगून ती ज्याजवळ असेल त्याकडून मिळवावी. तसेंच—

**तान्होवाच प्रातर्वः प्रतिवक्तास्मीति ते ह समित्पाणयः पूर्वाण्हे प्रतिचक्रमिरे ॥ ७ ॥ छान्दो. प्र. ५।११।**

प्राचीनशाल औपमन्यव, सत्ययज्ञ पौलुषी, इंद्रद्युम्न भाल्लवेय, जनशार्क राक्ष्य, बुडिल आश्वतराश्वि हे सर्व अश्वपति राजाजवळ उपदेश घेण्यासाठीं गेले, तेव्हां राजानें सांगितलें कीं, "मी तुम्हांस उद्यां सकाळीं उपदेश करीन. त्याप्रमाणें ते दुसऱ्या-दिवशीं हातांत समिधा घेऊन आले व त्यांस राजानें उपदेश केला." यावरूनहि क्षत्रि-याकडून ब्राह्मण विद्या शिकत, असें होतें. विदुरानें धृतराष्ट्राला, सूतानें शौनकादि-कांनां, धर्मव्याध चांडालानें कौषिकाला उपदेश केलेला प्रसिद्ध आहे. ( भारत. अ. २०६–२१६ ) तसेंच कौशिक ऋषीला एका स्त्रीनें उपदेश केला असें भारत वन. अ. २६ मध्यें लिहिलें आहे. ज्या स्त्रिया स्वतः व्याख्यान करतात व उपदेश देतात त्यांस "**आचार्या**" असें म्हणतात व आचार्यांची जी स्त्री असेल तिला "आचा-र्यानी" असें म्हणतात. असा भेद कौमुदीकार ( अष्टा. अ. ४।१।४९ ) या सूत्रा-मध्यें करतात. त्यावरूनहि उपदेश करण्याचा अधिकार स्त्रियांनां होता असें दिसतें. आतां ब्राह्मणांचें जसें मुख्य काम विद्या शिकविणें आहे, त्याचप्रमाणें क्षत्रियांचें प्रजा-रक्षण हें आहे ही गोष्ट खरी व आपआपलीं कामें त्यांणीं करावीं हें योग्यच आहे पण विशेष कारणास्तव तीं दुसऱ्यांनीं करूं नयेत असें नाहीं. हें वरील उदा-हरणांवरून स्पष्टपणें दिसून येईल.

कित्येक पुराणांतील गोष्टींवरून शिष्यांनां विनाकारण त्रास देणें हें गुरूंचें काम आहे असें कित्येकांस सध्यां वाटतें. कोणी शिष्यांनां जमीन नांगरण्यास तर दुसरा शेताला पाट बांधण्यास सांगतो. अशा गोष्टी पुष्कळ आहेत पण त्यांत "गुरूवर विश्वास ठेवावा" एवढ्या अर्थवादापेक्षां जास्ती कांहीं नाहीं. गुरूच्या अंगीं शिष्य-वात्सल्यादि पूर्वी दिलेले गुणच अवश्य असले पाहिजेत व तसेच दयाळू गुरू चहूंकडे झाले पाहिजेत. विशेषतः लहान वयांत मुलाची मारहाण करून त्यास विद्येचें भय उत्पन्न न करतां विद्याभिरुचि त्याच्या अंतःकरणांत उत्पन्न होईल असेंच शिकविणारे गुरू पाहिजेत. लहान मुलांनां समजत नाहीं म्हणून त्यांनां मारमारून गप्प बसविणें हा शुद्ध मूर्खपणा आहे. बालोद्यान शिक्षणक्रमाप्रमाणें शिकविण्याची पद्धत सुरू केल्यास फारच फायदा होईल. अर्थात् सौम्यपणानें हळू हळू त्याच्या मनांत विद्या स्थिर होईल असें केलें पाहिजे.

( १ ) बालोद्यानशिक्षणपद्धति ही लहान वयांत पुष्कळ विषय सहज शिकविण्यास व मुलांच्या मनांत विद्याभिरुचि उत्पन्न करण्यास फारच उत्तम आहे. या पद्धतीप्रमाणें जेथें शिक्षण दिलें जातें तेथें पांच सहा वर्षांचीं मुलेंहि आनंदानें शिकत असतात व त्यांनां खेळतां खेळतां अनेक विषयांची माहिती सहज होते. पण घोकंपट्टी व मोठे विकट पाढे आधीं शिकविल्यानें मुलें शाळेंत जाण्यास कंटाळतात व शिक्षकांनां छडीचा उपयोग करावा लागतो. लहानपणीं मुलांची बुद्धि लहान व कोंवळी असते म्हणून त्यावेळीं हंसून, खेळून त्यांनां शिक्षण दिलें पाहिजे. बागबगीचा, निरनिराळ्या पदार्थांचीं चित्रें, लहान मोठ्या मूर्ती व खेळणीं यांच्या सहाय्यानें लहान मुलांनां शिकविलें पाहिजे. स्थूलावरून सूक्ष्माचें ज्ञान होणें हा सृष्टीचा धर्म आहे. त्याचप्रमाणें शिक्षण पाहिजे. आधीं स्थूलपदार्थांचें ज्ञान व मग सूक्ष्मपदार्थांचें ज्ञान. आधीं भाषा व मग व्याकरण. आधीं व्याकरण शिकून मग भाषा शिकविणें हें लहानपणीं फारच वाईट. करितां अशा सृष्टिनियमानुकूल बालोद्यान पद्धतीप्रमाणें शिक्षणक्रम लहान मुलांसाठीं सुरू झाला पाहिजे.

( २ ) जसजशी मुलांची बुद्धि वाढत जाईल तसतसें त्याला महत्वाच्या विषयांचें शिक्षण द्यावें. त्यांच्या वयाच्या अनुरूपच त्यांनां वाचनाचीं पुस्तकें व कविता वगैरे दिल्या पाहिजेत. नाहींतर अकालीं परिपक्व विचार सांगितल्यानें त्यांनां ते समजणार नाहींत व त्यांपासून इष्टकार्यहि होणार नाहीं.

( ३ ) मुलांची तर्कशक्ति व स्मरणशक्ति ज्या रीतीनें वाढेल त्या पद्धतीनें शिक्षण त्यांस दिलें पाहिजे व शिकविण्याची गोष्ट मुलांनां तर्कानें समजेल असें त्यांस शिकविलें पाहिजे. मुलें जी गोष्ट तर्कानें जाणतात ती तीं कधींहि विसरत नाहींत हा अनुभव सार्वात्रिक आहे.

( ४ ) मुलांनां शिकविण्याचा विषय उदाहरणांनीं त्यांनां ज्यावेळचा त्यावेळींच समजावून द्यावा. म्हणजे तो बरोबर त्यांच्या ध्यानांत राहतो. भूगोलांतील देश त्यांनां सांगावयाचे असतां त्यांनां भूगोलच दाखवून त्यांच्या अंतःकरणांत देशांची कल्पना ठसेल असें करावें व त्याच प्रमाणें इतर विषयांसंबंधानेंहि समजवावें.

( ५ ) ज्यावेळीं मुलें थकलेलीं असतील त्यावेळीं त्यांस शिकवूं नये. त्यायोगानें त्यांची धारणाशक्ति क्षीण होत जाते. वयाच्या मानानें शिक्षणाचे तास कमी अधिक असावे. सहा वर्षांच्या मुलालाहि सहा तास शाळा व वीस वर्षांच्या मुलालाहि सहा तास शाळा असें असूं नये. लहानपणीं इतके श्रम तोलत नाहींत व त्यांनां मधून मधून विश्रांति पाहिजे असते.

( ६ ) माता, पिता, गुरु, विद्याधिकारी यांणीं मुलांच्या शिक्षणक्रमाकडे फारच सूक्ष्म रीतीनें पाहिलें पाहिजे. असें करणें हें त्यांचें काम आहे व या सर्वांनीं मिळून विद्यार्थ्यांचा शिक्षणक्रम आनंदकारक होईल असें केलें पाहिजे. आनंदानें शिकविल्यास मुलें जास्त शिकतात व मारानें त्यांचें दुर्लक्ष्य होतें असा सर्वसाधारण अनुभव आहे.

( ७ ) कठीण विषय मुलांनां सकाळीं शिकवावे व सुलभ विषय संध्याकाळीं शिकवावे कारण, सकाळीं त्यांचें चित्त प्रफुल्लित, एकाग्र व स्थिर असतें व संध्याकाळीं तसें नसतें.

( ८ ) मुलांनां त्यांच्या आयुष्यांत उपयोगी पडेल व त्यांचा व देशाचा उत्कर्ष होईल असेंच शिक्षण दिलें पाहिजे नोकरीसाठींच दिलें जाणारें शिक्षण सर्वथैव त्याज्य होय. ज्ञानासाठीं विद्या शिकली पाहिजे. ज्याला ज्ञान असेल तो पाहिजे तेथें उदरनिर्वाह करील. उदरनिर्वाहासाठीं घातुक शिक्षणक्रम कधींहि असूं नये. आई बापांनीं स्वतःच्या चैनीसाठीं व डामडौलासाठीं पैसा व्यर्थ न उधळतां तो सर्व पैसा मुलांच्या शिक्षणाकडे खर्च करावा. मुलांनां गुणी करण्याकडे आईबापांचें लक्ष्य गेलें पाहिजे—

**गुणेषु क्रियतां यत्नः किमाटोपैः प्रयोजनम् ॥ विक्रीयन्ते**
**न घण्टाभिर्गावः क्षीरविवर्जिताः ॥ १४ ॥ सुभा प्र. २**

गुण मिळविण्याविषयींच हरएकानें प्रयत्न केला पाहिजे. व्यर्थ अवडंबराचा कांहीं-एक उपयोग नाहीं. चैन सोडून सर्वांचें विद्येकडे लक्ष लागलें पाहिजे. पृथिवीपासून परमात्म्यापर्यंत सर्व पदार्थांचें यथावत् ज्ञान होणें हें विद्येचें काम आहे. मुलांची सर्व विषयांत थोडथोडी मति व एका आवडीच्या विषयांत पूर्ण गति होईल अशी व्यवस्था झाली पाहिजे. वाचन, लेखन, भूगोल, खगोल, गणित, व्याकरण, साहित्य, इतिहास, पदार्थविद्या, रसायनशास्त्र इत्यादिकांची माहिती होणें अवश्य आहे.

( ९ ) लेखन, वाचन यांची अवश्यकता सार्वत्रिक आहे. हें सर्वांनां आलेंच पाहिजे. हजारों वर्षांपूर्वी होऊन गेलेले ऋषी व मुनी आज आम्हांस आपल्या लेखांच्या द्वारें नाना शास्त्रांचा उपदेश करीत आहेत. लेखनामुळें एकाला आपले विचार दुसऱ्याला सांगतां येतात. लेखन हें वळणदार, स्वच्छ व सहज वाचतां येण्यासारखें असावें. "स्वयमपि लिखितं स्वयं न वाचयति" अशी स्थिति असणें ठीक नव्हे. वाचन उत्तम व अर्थबोध करणारें असें असावें.

( १० ) भूगोलाचें ज्ञानहि अवश्यक आहे. देशदेशांतरांचें ज्ञान व एकाचा दुसऱ्याशीं संबंध हेंहि समजणें अवश्यक आहे. त्याशिवाय देशकालवर्तमानपरिस्थिति समजणें शक्य नसतें. म्हणूनच प्रत्येक धर्मकृत्य करावयाचें असतांना "देशकालौ संकीर्त्य" असें सांगितलेलें असतें.

( ११ ) "यद्यपि बहु नाधीषे तथापि पठ पुत्र व्याकरणम् ॥ स्वजनः श्वजनो माभूत् सकलं शकलं सकृत् शकृत् ॥ [ सुभाषि० प्र. २१२ ]" व्याकरणाशिवाय शुद्ध भाषा बोलतां किंवा लिहितां यावयाची नाहीं. म्हणून व्याकरणाची अवश्यकता आहे. "स्वजन" शब्दाच्या ठिकाणीं "श्वजन" असा प्रयोग केला तर "कुत्रें" असा अर्थ होईल. असा अर्थ बोलण्यांत व लिहिण्यांत होऊं नये म्हणून व्याकरणाची जरूरी आहे.

( १२ ) गणिताची अवश्यकता लहान व्यवहारापासून तों मोठ्या व्यवहारापर्यंत सारखी आहे. घरचा हिशोब, दुकानाचा हिशोब व तसाच राज्याचा हे सर्व गणितावरच अवलंबून आहेत. गणितानें दुसरेहि पुष्कळ लाभ होतात. कल्पकता, काटकसर, व्यवस्थितपणा वगैरे गुण गणितानेंच अंगीं येतात.

( १३ ) इतिहास शिकल्यानें पूर्वीच्या माणसांनीं कशीं कशीं कामें केलीं, सत्पुरुषांचीं चरित्रें कशीं आहेत, त्यांचा परिणाम तत्कालीन लोकांवर कसा झाला, कोणी कशी चूक केली व त्याचा परिणाम काय झाला व कोणी कसें चांगलें कृत्य केलें व त्याचा लाभ त्याला कसा मिळाला इत्यादि व्यावहारिक ज्ञान इतिहासापासून होतें. पूर्वींचा इतिहास हा पुढील चुका कमी करण्यास कारणीभूत होणारा एक मुख्य विषय आहे. इतिहासज्ञानापासून दूरदर्शीपणा येतो.

( १४ ) तर्कशास्त्रहि फार उपयुक्त आहे; पहाः—

**मोहं रुणद्धि विमलीं कुरुते च बुद्धिम् ॥ सूतेच संस्कृतपदव्यवहारशक्तिम् ॥ शास्त्रान्तराभ्यसन योग्यतया युनक्ति ॥ तर्कश्रमो न तनुते किमिहोपकारम् ॥ ३ ॥**

सुभा० प्र० २

"तर्कशास्त्राच्या अध्ययनानें मोहाचा नाश, बुद्धीची वृद्धि, सुसंस्कृतता, व्यवहारसमर्थता, शास्त्राभ्याससमर्थता इत्यादि गुण अंगीं येतात." तर्कशास्त्राच्याच योगानें खरे खोटेपणाचा निकाल करतां येतो व योग्यायोग्यतेचा निकालहि त्यानेंच लागतो.

( १५ ) भूमापन ( सर्वे ) हेंहि अत्यावश्यक आहे. शहरें वसविणें, बांध बांधणें रस्ते आंखणें, कालवे काढणें, पूल बांधणें याकामीं याचा उपयोग फार होतो. पूर्वीं ही विद्या होती. पहाः—

दशयोजन विस्तीर्णं शतयोजनमायतम् ॥ ७२ ॥
वा. रामा. युद्ध. स. २२

हस्तिमात्रान्महाकायाः पाषाणांश्च महाबलाः ॥ पर्वतांश्च समुत्पाट्य यन्त्रैः परिवहन्ति च ॥ ५६ ॥ सूत्राण्यन्ये प्रगृह्णन्ति ह्यायतं शतयोजनम् ॥ ५८ ॥ नलश्चक्रे महासेतुं मध्ये नदनदीपतेः ॥ स तदा क्रियते सेतुर्वानरैर्घोरकर्मभिः ॥ ५९ ॥ दण्डानन्ये प्रगृह्णन्ति विचिन्वन्ति तथाऽपरे ॥ वानरैः शतशस्तत्र रामस्याज्ञापुरःसरैः ॥ ६० ॥
वा. रा. यु. स. २१.

"शंभर योजनें लांब सेतु रामाच्या आज्ञेनें नलानें बांधला. तो बांधण्यासाठीं हत्तीसारखे मोठमोठे दगड व पर्वताचे मोठमोठे तुकडे यंत्रांच्या सहाय्यानें वानर आणीत होते. कोणी सूत्रें घेऊन मापें घेत, कोणी काठीनें मोजीत. अशा रीतीनें हा मोठा सेतु नलाच्या देखरेखीखालीं तयार झाला." तात्पर्य भूमापन व समुद्रमापन या व शिल्पविद्यादिक कला पूर्वी होत्या व त्या विद्यांच्या सहाय्यानें रामचंद्रासारखे राजपुत्र देश संरक्षणासारखें कृत्य तडीस नेत असत. रावणासारख्या बलाढ्य व समुद्राच्या मध्यभागीं बसलेल्या शत्रूचा पराभव करीत व सनातन धर्माचा ध्वज चहूंकडे गाजवीत असत. तात्पर्य या विद्यांची अवश्यकता आहे. अशिक्षित लोकहि कसेंतरीं काम पार पाडतात पण सुशिक्षित लोक थोड्या वेळांत व थोड्या खर्चात उत्तम काम करतात म्हणून त्या त्या शास्त्रांत पूर्ण प्राविण्य मिळविण्याची जारीनें खटपट झाली पाहिजे.

( १६ ) यंत्रकलेची अभिवृद्धि ही देशोन्नतीला अवश्यक असल्यामुळें तिचीहि वाढ झालीच पाहिजे. सध्यां नेहेमींच्या उपयोगांत येणाऱ्या जिन्नसा—कागद, लेखणी, टेबल, खुर्ची, घड्याळ, दिवाबत्ती, कपडेलत्ते वगैरे सर्व—यंत्रांच्या द्वारानेंच होतात. यंत्रानें एक मनुष्य दहामनुष्यांचें काम करूं शकतो. यंत्रानें सुबकता, सारखेपणा वगैरे गुण पदार्थांत येतात. वरील रामायणांतहि यंत्रांच्या द्वारानें पूल बांधण्याचें काम झाल्याबद्दल लिहिलें आहे. सध्यांहि त्याचा अनुभव प्रत्यक्ष आहे, म्हणून यंत्रशास्त्राचें ज्ञान झालें पाहिजे.

( १७ ) याचप्रमाणें पदार्थविद्या, दर्शनानुशासनशास्त्र, रसायनशास्त्र, भूगर्भविद्या, कृषिकर्मविद्या, वास्तुविद्या, अनेक भाषापरिज्ञान, काव्यशास्त्र, अलंकारशास्त्र, छंद शास्त्र,

चित्रविद्या, वक्तृत्वविद्या, गायन, वादन, नाट्य, अर्थशास्त्र, धनुर्विद्या, सैन्यपद्धतिशास्त्र, राजनीति, खगोलशास्त्र, वैद्यक, औषधें तयार करणें, विमानबंधन, नौकाबंधन, आकृतिविद्या–सामुद्रिक–मस्तुलुंगेंद्रियशास्त्र, सृष्टिक्रमशास्त्र, लोकव्यवहारशास्त्र, संपत्तिशास्त्र, वनस्पतिशास्त्र, इत्यादि सर्व शास्त्रें मानवी जातीच्या फायद्याचीं आहेत म्हणून त्यांचें यथाशक्ति अध्ययन ब्रह्मचर्यांत करणें सर्वथैव इष्ट आहे.

(१८) याचप्रमाणें **स्वाध्याय, वेदचतुष्टय, सहा अंगें व उपांगें, ब्राह्मणें व स्मृति इत्यादिकांचें अध्ययन अत्यंत महत्वाचें आहे. याणें प्रत्येकाला धर्मज्ञान होणारें असल्यामुळें या अध्ययनाकडे कोणींहि दुर्लक्ष्य करतां नये.** सध्यां पूर्वोक्त भौतिक विद्यांचें थोडेंसें शिक्षण देतात पण त्याबरोबर धार्मिक शिक्षणाचा अभाव होत असल्यामुळें नास्तिकत्व व दुही वाढत चालली आहे. त्यासाठीं दोनीहि शिक्षणांची सांगड घातली जाईल असा शिक्षणक्रम झाला पाहिजे. अर्थात् वरील धर्मग्रंथ अवश्य अध्ययनापैकीं समजावें.

(१९) वयाच्या मायानें मोठ्या विद्यार्थ्याला सात तास व लहान विद्यार्थ्याला दहातास झोंप पुरे आहे. घरीं व शाळेंत मिळून मोठ्या मुलानें बारा तास अभ्यास करावा व लहान मुलांनें कमींत कमी घरीं व शाळेंत मिळून पांच तास करावा. सर्व मुलें छात्राश्रमांतच राहण्याची सोय झाली पाहिजे व त्यांवर देखरेख कार्यदक्ष विद्वानांची असावी. साधारणपणें विद्यार्थ्यांची दिनचर्या पुढें लिहिल्याप्रमाणें असावी:–वयपरत्वें साडेचार वाजल्यापासून सहा वाजेपर्यंत उठावें व सात वाजेपर्यंत प्रातर्विधि व स्नानादिक आटोपून ईश्वरोपासनादिक धार्मिक कृत्येंहीं आठ वाजेपर्यंत सर्व संपवावीं. नऊ वाजेपर्यंत विद्याभ्यास करून नंतर भोजन करणें. पुढें बारा वाजेपर्यंत विद्याभ्यास व पुढें एक तास विश्रांति, दोन वाजेपर्यंत फलाहारवगैरे करून पांच वाजेपर्यंत विद्याभ्यास. सहा वाजेपर्यंत व्यायाम, सहलवगैरे करून सायंसंध्योपासना वगैरे करणें व नंतर दोन तास अभ्यास करणें. तदनंतर भोजन करून थोड्या विश्रांतीनंतर साडेनवापासून दहा वाजेपर्यंत निजण्यास जाणें. याप्रमाणें दिनचर्या ठेवावी. विद्यार्थ्यांच्या वयपरत्वें अवश्य फेरबदल करणें तो करावा. पण साधारणतः असें शिक्षण मिळाल्यास मनुष्य नियमित होईल यांत शंका नाहीं.

(२०) सर्व शिक्षण जन्मभाषेंतच दिलें पाहिजे कारण, परभाषेंत दिल्या जाणाऱ्या शिक्षणापासून फारच नुकसान होतें. मेंदूवर अत्यंत दाब बसून बुद्धिहीनत्व व शक्तिक्षीणत्व येतें. यासाठीं शिक्षणक्रम स्वभाषेंत असावा. अनेक भाषा शिकण्यास मुळींच हरकत नाहीं. पण त्या सर्व स्वभाषेच्या द्वारानें शिकविण्यांत याव्या व इतर शास्त्रेंहि तशींच स्वभाषेंतूनच शिकवलीं जावीं. **सर्व शास्त्रांचा उपयोग**

जसा व्यवहारांत आहे तसा तो वेदांचा अर्थ समजण्यालाहि सहाय्य करणारा आहे. म्हणून सर्व आर्यपुत्रांनीं जुन्या व नव्या शास्त्रांत पूर्णत्व मिळविण्याची खटपट करावी. जो अभ्यास करील त्यालाच पूर्णत्व मिळेल इतरांनां नाहीं. पहा —

समानमीहमानानां चाधीयानानांचकेचिदर्थैर्युज्यन्ते अपरे न तत्र किमस्माभिः कर्तुं शक्यं स्वाभाविकमेव तत् ॥

महाभाष्य १।१।६।३८

"गुरु सर्वांनां सारखेंच शिकवितो. जे विद्यार्थी पूर्ण लक्ष लावतात त्यांची त्यांत गति होते व इतर तसेच मागें राहतात." अर्थात् जे मेहेनत करतात व एकाग्रतेनें अध्ययन करतात त्यांनां गुरूच्या सांगण्याचा लाभ मिळतो. पण जे आळशी असतात त्यांनां कांहीं लाभ होत नाहीं.

सेवेतेमांस्तु नियमान् ब्रह्मचारी गुरौ वसन् ॥ सन्नियम्येन्द्रियग्रामं तपोवृद्ध्यर्थमात्मनः ॥१७५॥ मनु० अ० २।
शान्तः । दान्तः । ह्रीमान् । दृढधृतिः । अग्लास्नुः ॥
अदिवास्वापी ॥ १८–२४ ॥ आपस्तं० सू० १।२॥
( न ) मैथुनं । मधुमांसे० ॥ २३ ॥ गोभिल० गृ० सू० ३।२।
स्वाध्यायधृग्धर्मरुचिस्तपस्व्यृजुर्मृदुः सिध्यति ब्रह्मचारी ॥ २९ ॥ आपस्तम्ब सू० १।१।४।

"ब्रह्मचाऱ्यानें नियम पाळावे, इंद्रियें स्वाधीन ठेवावीं व सदाचरणानें वागून तेज वाढवावें." "चित्तवृत्ति शांत ठेवणें, इंद्रियांचा निग्रह करणें, वाईट कर्म करण्याची भीति व लाज बाळगणें, धैर्यधरणें, न थकणें, दिवसा न निजणें हे ब्रह्मचाऱ्याचे नियम आहेत." "मैथुन, वीर्यक्षीणता होईल असें कृत्य, मांसभक्षण व सुरापान हीं ब्रह्मचाऱ्यानें वर्ज्य केलीं पाहिजेत–" स्वाध्यायतत्पर, धर्मावर श्रद्धा ठेवणारा, शीतउष्णादिक द्वंद्वें सहन करणारा, निस्पृह, सरळ वर्तनाचा, कोमल अंतःकरणाचा जो ब्रह्मचारी असतो तो ब्रह्मचर्यनियमांप्रमाणें वागून विद्येची सिद्धि मिळवितो."

शिष्यं ब्रूयात् कामक्रोधलोभमोहमानाहंकारेर्ष्यापारुष्यपैशून्यानृतालस्यायशस्यानि हित्वा नीचनखरोम्णा

शुचिना कषायवाससा सत्यव्रतब्रह्मचर्याभिवादनतत्परेणावश्यं भवितव्यं मदनुमतस्थानगमनशयनासन भोजनाध्ययनपरेण भूत्वा मत्प्रियहितेषु वर्तितस्य सतोऽन्यथा ते वर्तमानस्याधर्मो भवत्यफला च विद्या न च प्राकाश्यं प्राप्नोति अहं वा त्वयि सम्यग्वर्तमाने यद्यदन्यथादर्शी स्याम एनोभाग् भवेयम् अफलविद्यश्च ॥

सुश्रुत. सू० अ० २।

"गुरूनें शिष्य आल्याबरोबर त्याला सांगावें कीं, तूं काम, क्रोध, लोभ, मोह, गर्व, अहंकार, क्रौर्य, कटुवाक्य, चुगली करणें, असत्य भाषण, आळस, हे दुर्गुण सोडून दे व आपलीं नखें व केंस वेळच्यावेळीं (हजामाकडून) कापवून घेऊन नीट स्वच्छ ठेव, सत्य बोल, ब्रह्मचर्याचे नियम पालन कर, थोरांना नमस्कार कर व मी सांगेन त्या ठिकाणीं गमन कर; त्याशिवाय कोठेंहि जाऊं नको. तसेंच शयन, भोजन, आसन व अध्ययन माझ्याच मताप्रमाणें करीत जा. असें केलेंस तरच तुझें सर्व प्रकारें कल्याण होईल. नाहीं तर तुझी (स्वैर वर्तनानें) फार हानि होईल. मीहि तुझ्याशीं योग्य रीतीनें वागेन व सर्व विद्या नीट रीतीनें शिकवीन. जर असें मी न करीन तर माझाहि दुर्लौकिक होईल." पहा. पूर्वीच्या काळीं किती निस्पृहता होती ती. पण आतां सर्वत्र स्वार्थपरायणता सुरू झाली आहे. तसेंच—

सत्यधर्मार्य्यवृत्तेषु शौचे चैवारमेत्सदा ॥ शिष्यांश्च शिष्याद्धर्मेण वाग्बाहूदर संयतः ॥ १७५ ॥ मनु अ. ४

पुत्रमिवैनमनुकाङ्क्षन् सर्वधर्मेषु अनपच्छादयमानः सुयुक्तो विद्यां ग्राहयेत् ॥ २५॥ न चैनमध्ययनविघ्नेनात्मार्थेषूपरुन्ध्यादनापत्सु ॥ २६ ॥ आचार्योऽप्यनाचार्यो भवति श्रुतात् परिहरमाणः ॥ २८ ॥

आपस्तं० सू. १।२।८।

"गुरूनें सत्यधर्म, सदाचार व शुद्धता यांविषयीं प्रीति ठेवावी. शिष्यांनां शिकविण्याच्या पद्धतीप्रमाणें शिकवावें व शिष्यांनां शिकवितेवेळीं अपशब्द बोलूं नये, त्यांनां मारूं नये व आपल्या पोटासाठीं त्यांनां ठकवूं नये." सर्व शिष्यांनां आपल्या पुत्रांप्रमाणें

मानून, कोणत्याहि विद्येची छपवाछपवी न करतां, उत्तम प्रकारें सर्व विद्या त्यांनां शिकवाव्या. विद्यार्थ्यांच्या अध्ययनांत विघ्न आणून त्यांनां आपल्या खासगी कामाला लावूं नये. जो आचार्य विद्यार्थ्यांनां विद्या शिकवीत नाहीं, त्यांच्यापाशीं ती छपवितो, त्याला "आचार्य" असें कधींहि म्हणूं नये." ज्याप्रमाणें गुरूचें आचरण उत्तम पाहिजे त्याचप्रमाणें शिष्याचेंहि उत्तम पाहिजे. पहाः—

**य आतृणत्त्यवितथेन कर्णावदुःखं कुर्वन्नमृतं संप्रयच्छन् ॥**
**तं मन्येत पितरं मातरं च तस्मै न द्रुह्येत् कतमच्चनाह ॥**
**निरु० पू० २।१।७॥**

जो ( अदुःखं कुर्वन् ) दुःख न देतां, उत्तम पद्धतीनें विद्या शिकवून ( अवितथेन ) सत्यविद्योपदेशाच्या योगानें ( कर्णौ ) शिष्याचे दोनहि कान ( आतृणात्ति ) उघडतो व त्यांत ज्ञानरूपी ( अमृतम् ) अमृत ( संप्रयच्छन् ) उपदेशद्वारा ओततो किंवा देतो त्यालाच मातापिता असें म्हणावें व त्याच्याशीं कधींहि कपट करूं नये.

**अध्यापिता ये गुरुं नाद्रियन्ते विप्रा वाचा मनसा कर्मणा वा ॥ यथैव ते न गुरोर्भोजनीयास्तथैव तान्न भुनक्ति श्रुतं तत् ॥ निरु० पू० २।१।७॥**

जे विद्यार्थी कायावाचामनेंकरून गुरूचा आदर करीत नाहींत ते हीन होत; त्यांनां ती विद्या चांगली फलद्रुप होत नाहीं म्हणून शिकत असतांना व शिकून झाल्यावर गुरूविषयीं आदर बाळगावा व गुरूनेंहि शिष्याला नीट वागवावें. तसेंच—

**सर्वान् परित्यजेदर्थान् स्वाध्यायस्य विरोधिनः ॥ १७ ॥**
**मनु० ४**

**वशे कृत्वेन्द्रियग्रामं संयम्य च मनस्तथा ॥ सर्वान् संसाधयेदर्थान् अक्षिण्वन् योगतस्तनुम् ॥ १०० ॥ मनु० २**

"अध्ययनाला विघ्न उत्पन्न करणारे जेवढे म्हणून विषय असतील तेवढे सर्व टाकावे" व "सर्व इंद्रियें स्वाधीन ठेवून व मनाला आंवरून सर्व प्रकारच्या इष्ट विद्या प्राप्त करून घ्याव्या. विद्यार्थ्यानें ( तनुम् अ–क्षिण्वन् ) आपलें शरीर कृश होऊन बलहीन होईल असें आचरण–उपवासादिक–कधींहि करूं नये;" कारण, शरीर क्षीण झालें असतां विद्याभ्यास होणार नाहीं. म्हणून नेहेमीं शरीर सुदृढ राहील असें करावें. पहा—

न ब्रह्मचारिणो विद्यार्थस्य परोपवासोऽस्ति ॥ १७ ॥
आपस्तं. सू. १।१।२।

"ब्रह्मचाऱ्यानें विद्याध्ययन करावें. उपवास करूं नये. विद्याध्ययनापेक्षां उपवासाचें महत्व जास्त नाहीं. पहा—

चोदितो गुरुणा नित्यमप्रचोदित एव वा ॥ कुर्यादध्ययने यत्नमाचार्यस्य हितेषुच ॥ १९ ॥ मनु. अ. २

"गुरु सांगो किंवा न सांगो, शिष्यानें सदोदित अध्ययन करीत असावें. तसेंच सदोदित गुरूचें हित करीत असावें. आळसानें अध्ययनांत विघ्न कधींहि आणूं नये.

वेदोपकरणे चैव स्वाध्याये चैव नैत्यिके ॥ नानुरोधोऽस्त्यनध्याये होममन्त्रेषु चैव हि ॥ १०५ ॥ मनु० २.

"वेदांचीं व्याकरणादिक उपकरणें, होम, मंत्रोच्चारण व नित्यकर्म या व्यवसायांनां अनध्याय कधींहि नाहीं कारण, स्वाध्याय हें नित्यकर्म आहे. स्वाध्यायाची प्रशंसा वेदादि सच्छास्त्रांमध्येंहि सांगितली आहे.—

पा॒व॒मा॒नीर्यो अ॒ध्येत्यृषि॑भिः॒ सम्भृ॑तं॒ रसं॑म् ॥
तस्मै॒ सर॑स्वती दुहे क्षी॒रं स॒र्पिर्मधू॑द॒कम् ॥ ३२ ॥
ऋ० ७।२।१९॥

जो ( पावमानीः ) पवित्र व ऋषींनीं एकत्र जमवून ठेवलेल्या ( रसम् ) सारभूत विद्यांचें ( अध्येति ) अध्ययन करतो, ( तस्मै ) त्याच्या साठीं ( सरस्वती ) ती विद्या; दूध, तूप, मध, पाणी–अर्थात् सर्व योग्य पदार्थ–( दुहे ) प्राप्त करून देते. तात्पर्य उत्तम रीतीनें शिकलेल्या विद्येपासून सदैव आनंद प्राप्त होतो. पहा—

अथातः स्वाध्याय प्रशंसा प्रिये स्वाध्याय वचने भवतो युक्तमना भवत्यपराधीनोऽहरहरर्थान्साधयते सुख ँ स्वपिति परमचिकित्सक आत्मनो भवतीन्द्रियसंयमश्चै-कारामता च प्रज्ञावृद्धिर्यशो लोकपक्तिः प्रज्ञा च वर्ध-माना चतुरो धर्मान् ब्राह्मणमभिनिष्पादयति ॥
शतपथ० ११।४।९।१।

"जें कांहीं अध्ययन केलें असेल, तें जर अर्थज्ञानपूर्वक केलें तर मन प्रफुल्लित होतें, ज्ञानयुक्त होतें, असा विद्वान् कधींहि परतंत्र राहत नाहीं. ( अ–पराधीनः ) तो स्वतंत्र होतो, ( अर्थान् साधयते ) नाना प्रकारच्या कलाकौशलादिकांच्या सहाय्यानें धन मिळवितो. कोणत्याहि तऱ्हेची गृहसंबंधीं काळजी राहत नसल्यामुळें सुखानें निजतो. आत्म्याविषयीं तो विचार करतो, इंद्रियांचें दमन करतो म्हणून त्याला सदैव आराम मिळतो. त्याची बुद्धि वाढतें, त्याची कीर्ति चहूंकडे पसरते व त्याला ( चतुरःअर्थान् ) धर्म, अर्थ, काम व मोक्ष हे चारहि पुरुषार्थ प्राप्त होतात. याप्रमाणें विद्या संपादन करून तिचें मनन जो करतो तोच खरा ब्राह्मण होतो. तसेंच—

**यः स्वाध्यायमधीतेऽब्दं विधिना नियतः शुचिः ॥**
**तस्य नित्यं क्षरत्येव पयोदधि घृतं मधु ॥ १०७ ॥ मनु० २।**
**स्वाध्याय धर्मेण तपस्वी पुण्यो भवति, तपस्वी पुण्यो भवति ॥ तैत्तिरी० आर० प्र० १।**

**नित्यं स्वाध्यायशीलाश्च दुर्गाण्यतितरन्ति ते ॥ ९ ॥**
**महा० भा० शां० अ० ११०**

"जो उत्तम नियमपूर्वक, निदान एक वर्ष तरी, विद्याध्ययन करतो त्याला दूध, दहीं वगैरे सर्व भोग्य पदार्थ प्राप्त होतात." "विद्याध्ययनाच्या योगानें तपस्वी पुण्यात्मा होतो." "नित्य जे विद्याध्ययन करतात, त्यांचीं सर्व दुःखें नाहींशीं होतात."

**यथा यथा हि पुरुषः शास्त्रं समधिगच्छति ॥ तथा तथा विजानाति विज्ञानं चास्य रोचते ॥ २० ॥ –मनु० ४।**

मनुष्य जसजसें विद्याध्ययन करतो, जसजशी शास्त्रांत प्रगति करतो तसतसें त्याला विशेष ज्ञान प्राप्त होतें." तसेंच—

**सक्तुमिव तितउना पुनन्तो यत्र धीरा मनसा वाच मक्रत ॥ अत्रा सखायः सख्यानि जानते भद्रैषां लक्ष्मीर्निहिताधि वाचि ॥ २ ॥ ऋ० ८।२।२१॥**

ज्याप्रमाणें ( सक्तुम् ) पीठ ( तितउना ) चाळणीनें ( पुनन्तः ) साफ करतात, त्याप्रमाणें ( मनसा ) मनरूपी चाळणीनें ( वाचम् ) वाणीला, विद्या शिकून ज्याणीं शुद्ध केलें आहे, असे ( धीराः ) विद्वान् लोक सभेमध्यें अनेक गहन विषयांवर जें कांहीं बोलतात, ( सख्यानि ) तें हितकारक भाषण ( सखायः ) त्यांच्याप्रमाणें जे विद्वान् असतात त्यांसच ( जानते ) समजतें. जे अज्ञानी असतील त्यांनां तो विषय समजत नाहीं. अशा विद्वान् पुरुषांच्या ( वाचि ) वाणीमध्यें ( भद्रा लक्ष्मीः ) कल्याणकारक लक्ष्मीच ( निहिता ) वास करते. अर्थात् त्यांचें भाषण विलक्षण प्रकारें रमणीय व सद्विचारांनीं ओतप्रोत भरलेलें असतें. तसेंच—

**उतत्वं सख्ये स्थिरपीतमाहुर्नैनं हिन्वन्त्यपि वाजिनेषु ॥ अधेन्वा चरति माययैष वाचं शुश्रुवा ँ अफलामपुष्पाम् ॥**

ऋ० ८।२।२३।८॥

( उत ) खरोखर जो पुरुष ( स्थिरपीतम् ) सर्व विद्या अर्थ समजून शिकतो त्याची ( वाजिनेषु ) वाग्युद्धांत, शास्त्रार्थांत ( न हिन्वन्ति ) अवमानता होत नाहीं. त्याला सर्व लोक मान देतात. व जो ( अफलाम् अपुष्पाम् ) ज्ञानविज्ञानरूपी पुष्पफळें जिला नाहींत अशा प्रकारची ( वाचम् ) विद्या केवळ घोकंपट्टी करून ( शुश्रुवान् ) शिकला असेल व ( मायया ) जो कपटानें आपलें अवडंबर माजवतो तो खरोखर ( अधेन्वा ) वंध्या गाईप्रमाणें समजावा. ज्याप्रमाणें दुग्धहीन गाय निरुपयोगी असते तद्वत हा अविद्वानहि निरुपयोगीच होय. म्हणून नुसती घोकंपट्टी करूं नये. तसेंच—

**भद्रमिच्छन्त ऋषयः स्वर्विदस्तपो दीक्षामुपनिषेदुरग्रे ॥ ततो राष्ट्रं बलमोजश्च जातं तदस्मै देवा उपसन्नमन्तु ॥ १ ॥**

अथर्व० १९।५।४१।

( भद्रम् इच्छन्तः ) जनतेचें कल्याण इच्छिणारे ( स्वर्विदः ) व सुख जाणणारे ( ऋषयः ) सूक्ष्मदर्शी मुनिजन ( अग्रे ) प्रथम अवस्थेमध्यें, सत्यभाषण, जितेंद्रियता वगैरे ( तपः ) तप व विद्याध्ययन रूपी दीक्षा यांचें ( उपनिषेदुः ) सेवन करतात व

दुसऱ्यांकडून करवितात. ( ततः ) त्यामुळेंच राज्य, बल, वीर्यवगैरे प्राप्त होतात. असे जे विद्वान् होतात, ( तस्मै ) त्यांचा ( देवाः ) विद्वान् लोकांनीं ( उपसन्नमन्तु ) सत्कार करावा.

**यो वै ब्राह्मणानामनूचानतमः स एषां वीर्यवत्तमः ॥**
**शत० ब्रा० ४।१।८।१।**

**भूयोविद्यः प्रशस्यो भवति ॥ निरु० १।१।२।**

**यस्तु विज्ञानवान् भवति युक्तेन मनसा सदा ॥**
**तस्येन्द्रियाणि वश्यानि सदश्वा इव सारथेः ॥ ६ ॥**
**कठोपनिषद् व० ३**

"जो ब्राह्मणांत विद्येनें श्रेष्ठ तोच खरा पराक्रमी होय." "जो जास्त विद्या शिकतो त्याचीच प्रशंसा होते." "जो ज्ञान मिळवितो व ज्याचें मन स्वाधीन असतें त्याचीं इंद्रियें, चांगले घोडे जसे सारथ्याच्या स्वाधीन असतात त्याप्रमाणें, त्याच्या ताब्यांत असतात." तसेंच—

**सेनापत्यं च राज्यं च दण्डनेतृत्वमेव च ॥ सर्वलोका-**
**धिपत्यं च वेदशास्त्रविदर्हति ॥ १०० ॥ मनु० १२**

ज्याला वेद व शास्त्रें यांचा अर्थ समजला आहे त्यालाच-सेनापतीचें काम, राज्य-कारभाराचें काम, न्यायाधीशाची जागा व लोकांच्या परिपालनाचें काम देणें योग्य आहे. तात्पर्य, वेद व शास्त्रें जाणणाराचीच अशा मोठ्या जागेवर योजना झाली पाहिजे.

**न हायनैर्न पलितैर्न वित्तैर्न च बन्धुभिः ॥ ऋषयश्चक्रिरे**
**धर्मं योऽनूचानः स नो महान् ॥ १५४ ॥ —मनु० २**

"वय, पांढरे केंस, धनदौलत, बंधुवर्ग यांच्या योगानें मनुष्य मोठा होत नसून, जो विद्वान् असतो तोच खरा थोर होय." तसेंच—

**विद्वत्वं च नृपत्वं च नैव तुल्यं कदाचन ॥ स्वदेशे**
**पूज्यते राजा विद्वान् सर्वत्र पूज्यते ॥ ५९ ॥ पञ्चतं० २**

**सविद्यः पुरुषः श्रेष्ठो यत्रकुत्रापि तिष्ठति ॥ तत्रैव भवति श्रीमान् पूजापात्रं च भूभुजाम् ॥ ५ ॥ –पुरुषपरीक्षा.**

"विद्वत्त्व व नृपत्व हें कधींहि बरोबर होऊं शकत नाहीं कारण, विद्वानाचा सत्कार सर्वत्र होतो व राजाचा त्याच्या राज्यांतच होतो." "विद्वान् पुरुषच खरोखर श्रेष्ठ होय. तो कोठेंहि जरी असला तरी त्याचा सत्कार होतो व तो श्रीमंत होतो." जो ब्रह्मचर्याचे नियम पालन करून दृढनिश्चयानें विद्याभ्यास करतो तोच विद्वान् होतो. पण जो तसें न करील तो कसा बरें विद्वान् होईल? पहा.—

**उत त्वः पश्यन्न ददर्श वाचमुत त्वः शृण्वन्न शृणोत्येनाम् ॥ उतो त्वस्मै तन्वं विसस्रे जायेव पत्य उशती सुवासाः**

**॥ ४ ऋ० ८।२।२३॥**

"जो पुरुष पाहत असून विद्या शिकत नाहीं व ऐकत असूनहि (एनाम्) विद्या, (न शृणोति) उपदेश ऐकून शिकत नाहीं त्याला मुळींच सुख होत नाहीं. पण जो अर्थ व रहस्य यांसह विद्याध्ययन करतो त्याला ती विद्या सुखदायी होते. ज्याप्रमाणें (सुवासाः) चांगलें वस्त्र नेसलेली (उशती) व पतीला सुख देण्याची इच्छा करणारी (जाया) पत्नी (पत्ये) पतीला सुख देते त्याच प्रमाणें जो विद्या शिकतो (तस्मै) त्याला ती सुख देते." याप्रमाणें विद्वानाला सुख होतें पण जे मूर्ख राहतात त्यांनां दुःख होतें. पहा—

**कस्त्वविज्ञानवान् भवत्ययुक्तेन मनसा सदा ॥ तस्येन्द्रियाण्यवश्यानि दुष्टाश्वा इव सारथेः ॥ ५ ॥**

**कठोपनिषद् व० ३**

जो अविद्वान् असतो व ज्याचें मन ताब्यांत नसतें त्याचीं इंद्रियें, न शिकविलेल्या घोड्याप्रमाणें, त्याच्या ताब्यांत राहत नाहींत. अर्थात् त्याला त्यामुळें फार त्रास भोगावा लागतो.

**यस्त्वविज्ञानवान् भवत्यमनस्कः सदाऽशुचिः ॥ न स तत्पदमाप्नोति संसारं चाधिगच्छति ॥ ७ ॥**

**कठोपनिषद् व० ३**

जो विचारशून्य व कायावाचामनेंकरून अशुद्ध असतो, त्याला सुख प्राप्त होत नाहीं. त्याला या संसारांतील यातना भोगाव्या लागतात.

**लोकद्वारं विदुषां प्रपदनं निरोधोऽविदुषाम् ॥ ९ ॥**

**छान्दोग्य. ८।१।**

विद्वानांची गति सर्वत्र होते पण अविद्वानांनां मात्र सर्वत्र अडथळे येतात. तसेंच–

**वरं गर्भस्रावो वरमृतुषु नैवाभिगमनम् । वरं जातप्रेतो वरमपिच कन्यैव जनिता ॥ वरं वन्ध्या भार्या वरमपिच गर्भेषु वसतिः । न चाविद्वान् रूपद्रविणगुणयुक्तोऽपि तनयः ॥ ९ ॥ पञ्चतन्त्र ।**

मूर्ख पुत्र उत्पन्न होण्यापेक्षां गर्भस्राव होणें, स्त्रीसमागम सोडणें, पुत्र मृतच उत्पन्न होणें, कन्या होणें, भार्या वंध्याच असणें या सर्व गोष्टी चांगल्या आहेत. अर्थात् अविद्वान् पुत्रापासून फारच हानि होते.

**पण्डितोऽपि वरं शत्रुर्न मूर्खो हितकारकः ॥ वानरेण हतो राजा विप्राश्चौरेण रक्षिताः ॥ ४९१ ॥ पञ्चतन्त्र.**

मूर्ख मित्र असण्यापेक्षां विद्वान् शत्रू असणें चांगलें.

एकदां वानराशीं सख्य केल्यामुळें राजाला मरण प्राप्त झालें पण एक वेळ चोरांनींहि ब्राह्मणांचें रक्षण केलें." तसेंच—

**किं गर्जितेन वृषभेन पराजितेन । किं कोकिलस्वरकृतेन विना वसन्तम् ॥ किं कातरेण बहुशस्त्रपरिग्रहेण । किं जीवितेन पुरुषेण निरक्षरेण ॥ २६ ॥ नीतिशतक.**

लढण्यांत पराजय पावलेला बैल पुष्कळ गर्जना करूं लागला तरी त्याचा काय उपयोग? तसेंच वसंतऋतुशिवाय कोकिलस्वराला कोण विचारतो व भित्र्या मनुष्याजवळ पुष्कळ शस्त्रास्त्रें असलीं तरी त्यांचा काय उपयोग? त्याचप्रमाणें विद्याहीन पुरुषाचें जीवित्वहि व्यर्थ होय. तसेंच—

**न लोके राजते मूर्खः केवलात्मप्रशंसया ॥ अपि चेह मृजाहीनः कृतविद्यः प्रकाशते ॥४१॥ महा० वन० २०७**

**अजातमृतमूर्खेभ्यो मृताजातौ सुतौ वरम् ॥ यतस्तौ स्वल्पदुःखाय यावज्जीवं जडो दहेत् ॥ ४ ॥ पञ्चतन्त्र ।**

"मूर्खानें स्वतःची प्रशंसा केली तरी त्याचा महिमा वाढत नाहीं, पण विद्वान् कसाहि असला तरी त्याची सर्व प्रशंसा करतात." "अजात, मृत व मूर्ख अशा तीन प्रकारच्या पुत्रांमध्यें अजात व मृत हे दोघे चांगले कारण, त्यांच्यापासून थोडा त्रास होतो, पण निर्बुद्ध मुलगा फारच वाईट कारण, तो मरेपर्यंत त्रासच देत असतो." म्हणून सर्वांनीं आपल्या मुलांनां सुशिक्षण देण्याच्या व्यवस्थेला लागावें. विद्याभ्यास चालला असतां त्याचा विवाह वगैरे करूं नये. विद्या पूर्ण झाली म्हणजे मग विवाह करावा. आजन्म विद्याभ्यास करीत असलेंच पाहिजे पण विशेषतः चारहि आश्रमांच्या नियमांचें आंदोलन केलें असतां पुढील नियम आढळतातः—

**अष्टाचत्वारिंशद्वर्षं सर्ववेदब्रह्मचर्यम् ॥ गोभि० पू० ३।६॥ अष्टाचत्वारिंशद्वर्षाणि ॥ १२ ॥ पादोनम् ॥ १३ ॥ अर्धेन ॥ १४ ॥ आपस्तंब० सू० १।१।२॥**

अठ्ठेचाळीस वर्षेंपर्यंत, वेदादि सर्व विद्यांचें अध्ययन करण्यासाठीं, ब्रह्मचर्यव्रत पालन करावें किंवा छत्तीस वर्षेंपर्यंत करावें व तेहि शक्य नसल्यास चोवीस वर्षेंपर्यंत तरी करावें." छांदोग्या (च्या प्र० ३ खं० १६) मध्यें सांगितलें आहे कीं, जर अठ्ठेचाळीस वर्षांचें ब्रह्मचर्य पालन करणें कोणास अशक्य झालें तर निदान दुसरीं दोन, मध्यम (३६ वर्षांचें) व कनिष्ठ (२४ वर्षांचें) अशीं ब्रह्मचर्यें तरी अवश्य पालन करावीं. तसेंच—

**आयुषस्तु चतुर्थाङ्गं ब्रह्मचार्यनसूयकः ॥ गुरौ वा गुरु पुत्रेषु वा वसेद्धर्मार्थकोविदः ॥ १६ ॥ भारत. शां० २४१**

विद्याध्ययनासाठीं गुरुकुलीं आयुष्याचा चवथा हिस्सा–अर्थात् पंचवीस वर्षेंपर्यंत रहावें. आरोग्याच्या नियमांनीं वागलें असतां, मनुष्य सहज शंभर वर्षें वांचूं शकतो. वयोवृद्धीच्या अनेक नियमांपैकीं ब्रह्मचर्य हा एकच मुख्य नियम आहे. आरंभीच्या वयांत ज्याप्रमाणें ब्रह्मचर्याचें पालन होईल त्याचप्रमाणें पुढचें आयुष्य मोठें किंवा लहान होतें. सध्यां अल्पायुषी मनुष्य होत आहेत याचें कारण, ते ब्रह्मचर्याचें परिपा-

लन करीत नाहींत हें होय.* तसेंच उत्तम विद्वान् होऊन कोणतेंहि महत्कृत्य करावयाचें असलें तरीहि ब्रह्मचर्याची अवश्यकता आहे. पहा:—

**प्रणतिब्रह्मचर्योपसर्पणानि कृत्वा सिद्धिर्बहुकालात् तद्वत् ॥ १९ ॥ सांख्य. अ० ४**

**ब्रह्मचर्यत्वाविद्याग्रहणात् ॥ ५ ॥ वात्स्यायनसू० अ० २।**

"गुरुसेवा, ब्रह्मचर्यपालन व गुरुकुलीं–आचार्याजवळ–वास्तव्य, यांच्या योगानेंच सर्व विद्यांची सिद्धि होते." "विद्याध्ययन संपेपर्यंत पूर्णपणें ब्रह्मचर्य पालन केलेंच पाहिजे." याप्रमाणें ब्रह्मचर्याची थोरवी सर्व पूर्वींच्या शास्त्रकारांनीं गाइली आहे विद्याभ्यासासाठीं ब्रह्मचर्य धारण केलें पाहिजे व ब्रह्मचर्य धारण करून विद्याभ्यास केलाच पाहिजे. याप्रमाणें या दोघांचा निकट संबंध आहे. सध्यां कित्येक भोंदू लोक ब्रह्मचर्याचा वेष धारण करून इतस्ततः हिंडतात व लोकांनां फसवितात, तसेंच गांजा, भांग वगैरेचेंहि सेवन करतात पण तें सर्व घातुक व शास्त्राशीं विरुद्ध आहे. तें आचरण कोणींहि पवित्र मानूं नये. शास्त्राचा पूर्ण विचार करूनच पुढच्या पिढीला शुद्ध वळण लावलें पाहिजे. घराचा जसा आधारभूत पाया असतो त्याप्रमाणें ब्रह्मचर्य हें सर्व आयुष्याचा, सर्व पुरुषार्थांचा व महत्वाकांक्षांचा पाया आहे. पाया जोरदार नसला तर घर मोडून पडतें त्याचप्रमाणें सध्यां ब्रह्मचर्य नाहीं व त्यांत दुर्व्यसनांचा प्रसार फार यामुळें, पूर्ण आयुष्याचा लाभ न मिळतां, संतति अल्पायुषी होत चालली आहे. याकडे सर्वांनीं लक्ष्य दिलें पाहिजे. या सर्व गोष्टींचा विचार करूनच पूर्वींच्या ऋषींनीं ब्रह्मचर्याचे नियम पाळावे असें लिहिलें आहे. पहा—

**कृतनियमलङ्घनादानर्थक्यं लोकवत् ॥ १५ ॥ सांख्य० ४॥**

ब्रह्मचर्याचे नियम न पालन केल्यापासून फारच अनर्थ होतात म्हणून सर्वांनीं त्या नियमांचें पालन अवश्य करावें. तसेंच—

---

*"म्यान धी मास्टरपीस" नामक जगमान्य इंग्रजी पुस्तकांत मुलें अल्पायु निघण्याचें कारण पुढें दिल्याप्रमाणें दिलें आहे:–"**तंबाखू ओढण्याच्या व्यसनापासून जरी ओढणारावर तात्कालिक दुष्परिणाम घडून आलेले दृष्टीस पडले नाहींत तथापि त्या दुष्ट व्यसनापासून भावी संततीवर अत्यंत दुष्परिणाम घडतात असें आतां पूर्णपणें ठरलें आहे. ज्या वाडवडिलांनां बरींच वर्षेपर्यंत तंबाखू ओढण्याचें व्यसन असतें, त्यांच्या मुलांमध्यें हृदयाचा रोग, (हार्टडिसीज्) क्षय व अशा सारखे रोग अंशतः झालेले असतातच.**" या शोधाकडे सध्यांच्या पिढीनें अवश्य लक्ष्य दिलें पाहिजे.

अनेन क्रमयोगेन संस्कृतात्मा द्विजः शनैः ॥ गुरौ वसन्संचिनुयाद्ब्राह्माधिगमिकं तपः ॥ १६४ ॥ मनु. अ. २

ब्रह्मचर्याच्या नियमांचें पालन करून व गुरुकुलीं राहून वेदादि सर्व विद्याध्ययनरूपी तपाचा संग्रह करावा. तसेंच—

ब्रह्मचारी ब्रह्मभ्राजंद्बिभर्ति तस्मिंन्देवा अधिविश्वें समोताः ॥ प्राणापानौ जनयन्नद्व्यानं वाचं मनो हृदयं ब्रह्मं मेधाम् ॥

॥ अथर्व० ११।२।१६।

"जो विद्यार्थी पूर्ण ब्रह्मचर्य धारण करून अभ्यास करतो तोच विद्वान् होतो. त्याचीं; मन, वाणी, हृदय व बुद्धि हीं उत्तम सुसंस्कृत होतात, त्याची विद्वानांमध्यें गणना होते, त्याचें तेज चहूंकडे पसरतें व त्याचे प्राण त्याच्या देहांत पुष्कळ कालपर्यंत वास्तव्य करतात–अर्थात् तो पूर्णायुषी बनतो." म्हणून सर्वांनीं शक्य तेवढें ब्रह्मचर्य परिपालन विद्यार्थीदशेंत अवश्य करावें व आनंदाचा लाभ प्राप्त करून घ्यावा. पहा—

वरं विद्यादीनामविरतगुणानां समुदितिम् । प्रयच्छत्यारोग्यं वपुषि पुरुषार्थं बलमथो ॥ यदैश्वर्यं राज्यादिकमपि च तेजो बहुविधम् । नरोन्नत्याश्चैतत् प्रथममिदमारोहणमपि ॥ १ ॥ सुखानां संभोक्ता परिचरणतो स्यैव मनुजो। वयस्यादेरादौ यत इह हि विद्या ग्रहणता ॥ नराणां भद्राणां समुचितमतस्तैः स्वयमथो सुसंसेव्यः पुत्रैरपि जितसुखैरुक्तविधिना ॥ २ ॥ यद्ब्रह्मचर्यं सुखभाजनं परं तत्सेवनीयं पुरुषेण यत्नतः ॥ न तद्विना स्वोन्नतिमिच्छता परं नरेण किञ्चित् किल कर्तुमीह्यते ॥ ३ ॥ सम्यक् प्रसाधितं ह्येतत् शतं भद्राणि यच्छति ।

परलोकसुखस्यैदं साधनं चोत्तमं मतम् ॥ ४ ॥ न सेवते नरो ह्येतत् दारिद्यं सोऽश्नुते भृशम् ॥ संपदं ये तु वाञ्छन्ति तैः संसेव्यं प्रयत्नतः ॥ ५ ॥ अनुभवति नितातं ब्रह्मचर्येण तेन प्रयतमतिसुखं यत् पूर्णलोकद्वयेष्टम् ॥ मनुजजनिमवाप्ते नैतदाशु प्रयत्नात् प्रथमवयसि सेव्यं नान्यथा सौख्यमेति ॥ ६ ॥ ओम् शांतिः ३ ॥

ब्रह्मचर्याच्या परिपालनानें शरीर सुदृढ होतें, आरोग्य वाढतें, शक्ति येते, पुरुषार्थ करण्यास उत्साह वाढतो, विद्या प्राप्त होते, संपत्ति व राज्यादिक ऐश्वर्यहि प्राप्त होतें, ऐहिक व पारमार्थिक सर्व सुखें प्राप्त होतात. जो ब्रह्मचर्य पालन करीत नाहीं त्याला पूर्ण विद्या शिकतां येत नाहीं व त्यामुळें तो दरिद्री व दुःखी होतो. म्हणून सर्व विद्यार्थ्यांकडून ब्रह्मचर्याचें परिपालन त्याच्या आईबापांनीं व पालकांनीं करवून घ्यावें.

## उपसंहार.

येथपर्यंत दिलेल्या आधारांवरून ब्रह्मचर्य म्हणजे काय, त्यांत काय करावयाचें, तें कोणी आचरावें, त्यापासून फायदे काय काय आहेत, या व इतर बऱ्याच मुद्यांचा सहजच विचार होण्यासारखा आहे. पूर्वी दिलेले आधार पाहिले म्हणजे त्यावरून तत्कालीन लोकमताचीहि बरीच कल्पना होणार आहे. आतां येथें पूर्वी आलेल्या विषयाचा सारांश दिला आहे, त्यावरून पूर्वीच्या आचारविचारांचा सध्यांच्या परिस्थितीशीं कसा मेळ घालावा व त्यापासून सध्यांच्या पिढीनें कसा नफा करून घ्यावा हें समजेल.

( १ ) मनुष्यमात्राला स्वतःचें, कुटुंबाचें, जातीचें, देशाचें व मोक्षसंबंधीं अशीं अनेक प्रकारचीं कर्तव्यें, त्याच्यात्याच्या योग्यतेनुरूप करावयाचीं असतात या पृथ्वीवर मनुष्यजन्मास आल्यावर त्याच्या ज्ञानानुरुप अनेक महत्वाकांक्षा त्याच्या मनांत उत्पन्न होतात व त्या केव्हां पार पाडीन असें त्याला होतें. महत्वाकांक्षा धरणें, अनेक कर्तव्यें करणें, दुःखांचा नाश करून सुख मिळविणें, धर्माप्रमाणें वागणें, संपत्ति मिळविणें, अनेक इच्छांची तृप्ति करणें किंवा मोक्ष प्राप्त करून घेणें इत्यादि सर्व प्रकारचीं कर्मे करण्यास परमेश्वरानें शरीर दिलेलें आहे. शरीर हें काम करण्याचें साधन आहे. ज्याप्रमाणें सुतार आपल्या आउतांनीं लांकडाचा चौरंग करतो, त्याचप्रमाणें मनुष्यानें शरीररूपी साधनाच्या योगानें पूर्वी सांगितलेल्या महत्वाकांक्षा सफल करून घेतल्या पाहिजेत. ज्याप्रमाणें सुताराचें शस्त्र बोंथट असलें किंवा जोरदार नसलें तर लांकूड तासण्याचें काम होत नाहीं, त्याचप्रमाणें जर हें शरीर सुदृढ व चपल नसलें तर

कोणताहि पुरुषार्थ होणार नाहीं. ज्याप्रमाणें–लहानमोठें काम करावयाचें असेल त्याप्रमाणें मनुष्याला बुद्धिमत्ता, योजकता, मानसिक व शारीरिक शक्ति, विद्वत्ता, चपलता, चित्तैकाग्र्य, आरोग्य इत्यादि गुणांची अवश्यकता आहे व मोठमोठे उद्योग पार पाडण्यास दीर्घ आयुष्याची अत्यंत अवश्यकता आहे. आयुष्य नसून इतर सर्व गुण जरी असले तरी त्यांचा कांहींएक उपयोग होणार नाहीं. जे पुरुष शरीराकडे दुर्लक्ष्य करून विद्याभ्यास करतात ते, त्यांचा अभ्यास संपत आहे नाहीं इतक्यांत मरणोन्मुख होतात असें आपण पाहतों. अशा विद्यार्जनाचा काय उपयोग? म्हणून शरीर व मन हीं दोन्ही सुदृढ झालीं पाहिजेत. तरच कांहींतरी पुरुषार्थ करून दाखवितां येईल. मन सुसंस्कृत होण्यास जशी विद्या पाहिजे त्याचप्रमाणें शरीर मजबूत होण्याला व्यायाम, उत्तम अन्न व वीर्यरक्षण हीं अवश्य आहेत. ब्रह्मचर्यामध्यें मन व शरीर यांचें आरोग्य साधावयाचें असतें व त्याच्या नियमांचें पालन केलें असतां, मन व शरीर हीं उत्तम सुदृढ होतात असा आजपर्यंतचा अनुभव असल्यामुळें ब्रह्मचर्यपालनाची अत्यंत अवश्यकता आहे कित्येक लोक आजन्म ब्रह्मचर्य स्वीकारून विद्याभ्यास व उपदेश करून लोकांचें हित साधतात. दुसरे कोणी अठ्ठेचाळीस, छत्तीस किंवा चोवीस वर्षें ब्रह्मचर्य पालन करून स्वहित व परहित साधतात. एवढी गोष्ट खरी कीं, निदान चोवीस वर्षें तरी पूर्ण ब्रह्मचारी सर्वांनीं बनलें पाहिजे. कोणी असें म्हणतील कीं, छत्तीस, अठ्ठेचाळीस वर्षांत आमच्या आयुष्याची समाप्ति होते, तेव्हां असें मरेपर्यंत ब्रह्मचारी राहणें इष्ट आहे काय? वास्तविक विचार केला असतां, हा प्रश्नच उत्पन्न होत नाहीं कारण, ब्रह्मचर्याचें पालन लहान वयांत केलें नाहीं म्हणून वीर्यक्षीण शरीर बनतें व त्यामुळें आयुष्यहि कमी होतें. जर शरीरांतील वीर्य लहानपणीं नष्ट झालें नाहीं तर त्या मानानें आयुष्यहि लांब होईल? ब्रह्मचर्य, चांगलें अन्न, योग्य व्यायाम, मनाची समता इत्यादि नियम पाळल्यानें शंभरापासून तीनशें वर्षेंपर्यंत आपलें आयुष्य वाढवितां येईल. पण जर त्या नियमांकडे दुर्लक्ष्य केलें तर अल्प आयुष्य होईल यांत शंका नाहीं. चैन, स्त्रैणपणा, व्यायामाचा अभाव वगैरे कारणांनीं आयुष्य क्षीण होतें. म्हणून हे सर्व दोष दूर करण्यासाठीं ब्रह्मचर्याचें नियमपूर्वक पालन झालेंच पाहिजे. कोणी म्हणतात कीं, हा देश उष्ण असल्यामुळें येथें जास्ती वयापर्यंत ब्रह्मचर्य पालन होणें शक्य नाहीं पण विचाराअंतीं हेंहि सयुक्तिक नाहीं असें वाटेल कारण, पूर्वींच्या इतिहासाकडे पाहिलें म्हणजे याच देशांत ब्रह्मचर्य पालन करणारे लोक लाखों होऊन गेले, असें आढळेल व पूर्वकालीं ब्रह्मचर्यानंतर गृहस्थाश्रम स्वीकारण्याची चाल सर्वसाधारण होती असेंहि आढळून येतें. मग आतांच ब्रह्मचर्य नको व लवकर लग्न केलें पाहिजे असें कां वाटावें? कां पूर्वींची हवा

थंड होती व आतांच काय ती उष्ण झाली आहे? तात्पर्य, पूर्व इतिहासावरूनहि सध्या ब्रह्मचर्य पालन होणार नाहीं असें म्हणवत नाहीं. बरें अशी कल्पना केली कीं, उष्ण कटिबंधांतील लोकांचे मनोविकार लवकर प्रबल होतात तर त्यांच्या निवारणार्थ खाण्यापिण्याच्या व राहण्याच्या व्यवस्थेंत योग्य फेरबदल करून ते मनोविकार इष्ट-कालींच जागृत व्हावें असें सहज करतां येईल. खाण्यापिण्यांत उष्ण पदार्थ असले व मुलांच्या कानावर वाईट गोष्टी वारंवार पडूं लागल्या म्हणजे त्यांच्या अंतःकरणांत तारुण्यांतील विचार येऊं लागतात हें खरें पण त्यांचीं कारणें जर आपण बंद केलीं तर ते विचार लवकर न येऊं देणें शक्य आहे. मुलांचीं मनें सहापासून आठ वर्षेंपर्यंत बहुधा बिघडलेलीं नसतात. त्या वयांत त्यांस जर शहराबाहेर असलेल्या, दुष्ट लोकांचा संबंध नसलेल्या व उत्तम हवापाण्याच्या ठिकाणीं बांधलेल्या पाठ-शालेंत कायमचें ठेविलें तर पंचवीस तीस वर्षें होईपर्यंत घातुक मनोवि-कार त्यांच्या अंतःकरणांत उत्पन्न होणार नाहींत यांत शंका नाहीं. अशा शालांची, शिक्षकांची, अध्ययन व्यवस्थेची व इतर सर्व बाजूंची योग्य व्यवस्था सध्यांच्या काळांत होणें इष्ट आहे यांत शंका नाहीं. या सर्व अडचणी प्रयत्नाअंतीं नाहींशा होणें शक्य आहे. तात्पर्य, पुढच्या पिढीकडून ब्रह्मचर्य परिपालन करवून घेणें व त्यांचें मन सुसंस्कृत करून त्यांचें शरीरहि सुदृढ करणें हें सध्यांचें पहिलें कर्तव्य होय.

(२) कोणत्याहि जातिभेदाचा अडथळा मनांत न आणतां सर्व मनुष्यांनीं ब्रह्मचर्य आवश्य पाळलें पाहिजे. ज्याप्रमाणें सर्वांनां हवा, पाणी, अग्नि इत्यादिकांची आवश्यकता आहे त्याचप्रमाणें ब्रह्मचर्यहि सर्वांनां जरूरीचेंच आहे. शूद्रांनीं अध्ययन करावें कीं न करावें याबद्दल वाद मुळींच नाहीं. कारण, रामायण, महाभारत व इतर तत्सदृश ग्रंथ हे शूद्रांनीं वाचावे म्हणूनच केले गेले आहेत. सध्यांचा वादग्रस्त मानला गेलेला मुद्दा, वेदाचा शूद्राला अधिकार आहे कीं नाहीं हा आहे. वास्तविक रीतीनें पहातां शूद्राच्या कुलांत उत्पन्न झालेला पण आचरणानें शुद्ध व बुद्धिमान् जो असेल त्याणें ब्रह्मचर्यव्रत धारण करावें व वेदाध्ययन करावें असें कित्येक आचार्यांचें स्पष्ट मत आहे. साधारण-पणें सदाचारसंपन्नता व अर्थग्रहणशक्ति ज्याला असेल त्याणें वेद वाचावे व आपला फायदा करून घ्यावा असें म्हणण्यास कांहीं हरकत नाहीं. या निबंधांत पूर्वी शूद्राच्या अध्ययनासंबंधानें जे आधार दिलेले आहेत, त्यांपैकीं कांहीं श्रुतींचा अधिकार सदाचारपरत्वें शूद्राला देणारे आहेत व कांहीं आधार श्रुतीशिवाय इतर शास्त्रांचें अध्ययन त्याणें करावें अशाविषयीं आहेत. एवढी गोष्ट खरी कीं, ब्राह्मण दुराचरणानें जसा लवकर पतित होतो तसा शूद्र सदाचरणानें लवकर उन्नतीला जात नाहीं. खालीं पडणें सोपें आहे व वर चढणें फार कठीण. पण तें अशक्य मात्र नव्हे. स्थूल, सूक्ष्म व कारण या तीनहि देहांची ज्याप्रमाणें शुद्धता होईल त्याप्रमाणें

वैश्य, क्षत्रिय व ब्राह्मण हे वर्ण बनतात. यासंबंधानें विशेष वर्णन येथें नको. एवढें येथें सांगितलें म्हणजे बस होईल कीं, ज्यांनां ज्यांनां ब्रह्मचर्याचा लाभ करून देतां येईल त्यांनां त्यांनां तो करून देण्यांत पक्षपात करतां नये. खालच्या दर्ज्याच्या लोकांनीं योग्य आचरण करून वरच्या दर्ज्याला पोंचावें हाच धर्माचा मूळ सिद्धांत आहे. पण त्याचा दुरुपयोग करून "वेदोक्त कर्मे आमच्या घरीं झालींच पाहिजेत" असाहि दुराग्रह कोणी धरूं नये. प्रथमतः सदाचारी बनून तो अधिकार प्राप्त करून घ्यावा. मांसभक्षणादिक, शरीराला तमोगुणी बनविणारीं भक्ष्यें व धूम्रपानादिक संततींत रोग उत्पन्न करणारीं व्यसनें, नीतिभ्रष्टपणा, विद्याहीनत्व व आचारभ्रष्टपणा हे हीनता आणणारे दुर्गुण न सोडतां आम्हांला वरच्या योग्यतेचा अधिकार पाहिजे असें म्हटलें तर तो कसा मिळेल? या ठिकाणीं आम्हीं हेंहि कबूल करतों कीं, जो कुलानें ब्राह्मण असतांहि आचारभ्रष्ट झाला असेल त्यालाहि वैदिक कर्माचा अधिकार राहत नाहीं, म्हणून शास्त्रें सांगत आहेत. म्हणून या सर्वांचा विचार करून, सदाचरणानें हवा तो अधिकार मिळतो असें समजून, सर्वांनीं सदाचारी बनण्याचा यत्न करावा. पुढची पिढी सदाचारसंपन्न करण्यासाठीं पुढच्या पिढीच्या शिक्षणाची सोय शास्त्राप्रमाणें लावण्याचा निश्चय केला पाहिजे व त्यांच्याकडून त्याप्रमाणें वागणूक करून घेतली पाहिजे.

(३) पुढच्या पिढीची सर्वतोपरी उन्नति करणें हें आपल्या हातांत आहे. सध्यांच्या चालू शिक्षणपद्धतीनें तें काम होणार नाहीं म्हणून त्या कामास स्वतंत्र रीतीनें व जारीनें लागलें पाहिजे. पूर्वीच्या ऋषींच्या आश्रमांच्या पद्धतीवर सध्यां पाठशाला सुरू केल्या पाहिजेत. नदीच्या तीरावर, तलावाच्या समीप किंवा पर्वताच्या शिखरावर रमणीय व भव्य स्थळीं आश्रम असत व तेथें तत्कालीन विद्यार्थ्यांचा विद्याभ्यास होत असे. विद्यार्थी, आश्रमांतच सर्वदा राहत असल्यामुळें गुरूच्या सदाचरणाचा ठसा त्यांच्या मनावर पूर्णपणें बठत असे. हे आश्रम शहरापासून फार अंतरावर असत त्यामुळें दुर्जनसंगति, गलिच्छ हवा व इतर शहरवस्तीपासून होणारे अपाय तेथें राहणाऱ्यांस होत नसत. डोंगरावर राहिल्यानें छाती विस्तृत होऊन फुप्फुसें मजबूत होतात त्यामुळें क्षयादि विकारांची छाया पडण्याचा संभव कमी. प्राथमिक वयांत शरीर वाढावयाचें असल्यानें स्वच्छ हवा, सुग्रास अन्न, सदाचारानें मनोनिग्रह, आरोग्य व विद्याभ्यास इत्यादि प्रकारच्या साधनांनीं मन व शरीर यांच्या वाढीला योग्य मदत होणें साहजिक आहे. म्हणून सध्यांच्या पाठशालाहि गांवांबाहेर रमणीय जागीं नदी किंवा तलाव यांच्या जवळ, किंवा डोंगरावर भव्य जागीं, उत्तम व प्रशस्त बागेमध्यें अशा स्थापिल्या पाहिजेत. तेथील अध्ययनक्रम व इतर व्यवस्थाहि विद्यार्थ्यांच्या हिताला योग्य अशाच

केल्या पाहिजेत. प्रत्येक गांवाच्या बाहेर शाला, प्रांतांतील उत्तम व भव्य जागीं एक मोठी पाठशाला व इलाख्यांतील सर्वोत्कृष्ट जागीं एक किंवा अनेक विश्वविद्यालयें अशीं स्थापन झालीं पाहिजेत. शहरामध्यें मुलें वीर्यभ्रष्ट व उदात्तमनोवृत्तिहीन होण्याला जीं कारणें होतात, तीं प्रारंभापासून काढून टाकण्याची व्यवस्था करण्यासाठीं वरच्या प्रमाणेंच प्रयत्न झाला पाहिजे. शालेंत, पाठशालेंत किंवा विश्वविद्यालयांतच विद्यार्थ्यांची व गुरूंची राहण्याची सोय झाली पाहिजे व इतर व्यवस्थाहि योग्य नियमाप्रमाणेंच झाली पाहिजे.

( ४ ) ज्याप्रमाणें राहण्याची व्यवस्था उत्तम पाहिजे त्याच प्रमाणें खाण्यापिण्याचीहि व्यवस्था वैद्यशास्त्राला अनुकूल केली पाहिजे. खाण्यापिण्यांत गोड, कडू, आंबट, तिखट, खारट व तुरट हे सहा रस येतात. त्याचप्रमाणें तेल, तूप हे स्नेहयुक्त पदार्थ व दूध, दहीं तसेंच फळफळावळ, भाजीपाला व धान्यें यांचा प्रत्यहीं उपयोग होतो. ऋतुमानाप्रमाणें खाण्यापिण्यांत फेरबदल झाला पाहिजे व तिखट, आंबट अशासारखे भेदक पदार्थ कमी करून तूप, दूध, गोड असे पौष्टिक, शक्तिवर्धक पदार्थ जास्त खाण्यांत आले पाहिजेत. रस्य, स्निग्ध, स्थिर व मनाला आनंद देणारें सात्विक अन्न फार फायद्याचें असतें. कडु, आंबट, खारट, तिखट, रूक्ष, जळजळणारें अन्न व शिळें अन्न हें राजस व तामस असल्यामुळें हानिकारक होतें. आंबट, तिखट जास्त खाणारे मद्रासी लोक नेभळट व निःशक्त, व गोड व तूप दूध जास्त खाणारे पंजाबचे लोक जास्त सशक्त आहेत. यांचा विचार केला असतां, असें आढळून येईल कीं, सात्विक खाण्यानें पिंड सुदृढ व निरोगी होतो. पुष्कळांची समजूत अशी आहे कीं, जास्त आंबटतिखट खाल्याशिवाय शरीर सुदृढ होत नाहीं पण ही चूक आहे. दूध, तूप, दहीं, साखर, गहूं, डाळ, लोणी हे पदार्थ ज्यामानानें जास्त खाण्यांत येतील त्यामानानें शरीर सुदृढ व वीर्ययुक्त होतें. याकडे लक्ष्य देऊन व ऋतुमान आणि वयोमान पाहून छात्राश्रमांतील खाण्यापिण्याची व्यवस्था केली पाहिजे. पूर्वींच्या कालीं गांवांत मधुकरी मागून विद्यार्थी आपला निर्वाह करीत असत, पण सध्यांची लोकस्थिति व राहणी अगदीं विघडलेली असल्यामुळें विद्यार्थ्यांचा गांवाशीं संबंध जितका तोडावा तितका चांगला फायद्याचा आहे म्हणून विद्यार्थ्यांच्या रहाण्याची, खाण्यापिण्याची, कपड्यालत्त्यांची, पुस्तकांची व विद्याभ्यासाची सर्व सोय तेथच्या तेथेंच करण्यांत आली पाहिजे, मग ही विद्यार्थ्यांच्या घरच्या पैशानें होवो किंवा सामाजिक द्रव्यानें होवो.

( ५ ) अभ्यासक्रम प्राच्य व अर्वाचीन शास्त्रांच्या संमेलनात्मक असला पाहिजे. जन्मभाषा, हिंदीभाषा, संस्कृत व अवश्य तेवढ्या इतर भाषा यांचें अध्ययन तेथें केलें जावें. तसेंच षड्दर्शनें, षडंगें व इतर आर्षग्रंथ यांचें अध्ययन व

आधुनिक भौतिक शास्त्रें यांचें अध्ययनहि झालें पाहिजे. इतर देशांच्या भाषा आल्यापासून जगाशीं आपला संबंध ठेवितां येईल व जुन्या शास्त्रांची व नव्या शास्त्रांची एक समयावच्छेदेंकरून माहिती झाल्यानें जुन्यानव्यांत जो सध्यां विरोध दिसतो तो दूर होईल. सकृद्दर्शनीं इतकें अध्ययन होणें फार कठीण असें वाटतें. पण युक्तीनें व व्यवस्थितपणानें शिक्षणक्रम ठेविला तर वरच्याप्रमाणें अध्ययन होण्यास कठीण जाणार नाहीं. सर्व शिक्षण जन्मभाषेंतच झालें पाहिजे व इतर भाषा बहुश्रुतपणासाठीं शिकविल्या जाव्या. तसेंच आरंभीं सर्व शास्त्रांचें ज्ञान मूल तत्त्वांच्या रूपानें देऊन मग प्रत्येकाच्या इच्छेप्रमाणें त्या त्या स्वतंत्र विषयांत प्राविण्य मिळवितां येईल अशी व्यवस्था करण्यांत यावी.

याप्रमाणें ब्रह्मचर्याविषयींचा व त्यांतील कर्तव्याविषयींचा विचार आहे. **ब्रह्मचर्य हेंच पुरुषार्थाचें मूळ आहे** म्हणून त्याविषयीं नीट नियमपूर्वक वागण्यास प्रत्येकानें लागलें पाहिजे. शेवटीं.

## विश्वा॑नि देव सवितर्दुरि॒तानि॒ परा॑सुव ॥
## यद्भ॒द्रं तन्न॒ आसु॑व ॥ १ ॥ यजु० ३० । ३ ॥

" हे ( देव[1] ) सर्व विद्याप्रकाशक ! हे ( सवितः[2] ) जगदुत्पादक ! हे परमेश्वर ! आह्मांमध्यें ब्रह्मचर्याचें परिपालन न केल्यामुळें व इतर दुर्वर्तनामुळें जीं कांहीं ( विश्वानि ) सर्व ( दुरितानि ) पापें व दुःखें उत्पन्न झालीं आहेत, त्यांचा प्रतिकार होण्यासाठीं ब्रह्मचर्यादिक उत्तम नियमांचें आमच्याकडून पालन करून घे व तद्वारें त्या दुःखांचा ( परासुव ) नाश कर. तसेंच त्या सुनियमांच्या पालनानें ( यत् ) जें कांहीं ( भद्रम् ) कल्याण होणार आहे ( तत् ) तें ( नः ) आह्मांला ( आसुव ) करून दे" —या प्रमाणें परमेश्वराची प्रार्थना करतों.

॥ ओम् शान्तिः शान्तिः शान्तिः ॥

---

( १ ) देवो दानाद्वा द्योतनाद्वा । निरुक्तम् ॥ ( २ ) सविता वै सर्वस्य प्रसविता ॥ शत० ब्रा०

# शुद्धिपत्रक.

| पृष्ठ. | पंक्ति. | अशुद्ध. | शुद्ध. |
|---|---|---|---|
| १ | ४ | दूरक | दूरके |
| ३ | ८ | फलद्दप | फलद्रूप |
| ७ | १० | पण्यतम | पुण्यतम |
| ८ | १३ | पतिविरांजति | पतिर्विराजति |
| ९ | १४ | प्रजोजयेत् | प्रयोजयेत् |
| १० | ४ | ती दोनही | तों दोनहि |
| १३ | २३ | क्षर | क्षरं |
| २७ | ९ | साहता | संहिता |
| २८ | १६ | सुमन्तु | सुमन्तुं |
| ३१ | २३ | कर्तव्य असें व | कर्तव्य असे. |
| ३२ | १ | मागन | मागून |
| ३४ | १७ | द्रष्टा, | "द्रष्टा" |
| ३६ | २५ | शिकून व | शिकून |
| ,, | ,, | वेदर्षि | वेदवेत्त्या |
| ४४ | १२ | स्त्रीशद्रांना | स्त्रीशूद्रांना |
| ४७ | २१ | मति | गति |
| ४८ | ११ | अवश्यकता | आवश्यकता |
| ,, | २९ | बसविणें, | वसविणें, |
| ५० | ११ | दोनीही | दोनहि |
| ,, | १३ | मायानें | मानानें |
| ५८ | ३ | हें | हीं |
| ,, | ,, | नाहीं | नाहींत |
| ,, | १९ | कस्त्व | यस्त्व |
| ५९ | ८ | गुण | गण |
| ६२ | ९ | वियार्थी | विद्यार्थी |
| ६३ | ४ | नितातं | नितान्तं |
| ,, | १९ | पृथ्वी | पृथिवी |

स्वस्त ! **चारी मूल वेद.** अति स्वस्त ! !

ज्या परम पित्यानें आमच्या हितार्थ पृथिव्यादि अनेक पदार्थ रचले त्यानेंच आमच्या जीवनसहाय्यार्थ सृष्टीचे आरंभीं वेदद्वारें ज्ञानाचेंहि दान केलेंच आहे. आणि त्याच ज्ञानानें आम्हीं एक वेळ उन्नतीच्या शिखरावर चढलों होतों. पण हल्लीं ? वेदज्ञानाच्या परित्यागानेंच आम्हीं अवनती भोगीत आहों.

बायबल व कुराण ज्याच्या संग्रहीं नाहीं असा एक तरी ख्रिस्ती व महंमदानुयायी असेल काय ? मग ज्ञानाच्या शिखरावर नेऊन बसविणारे वेद ( आमचे धर्मग्रंथ ) आम्हां आर्यांच्या संग्रहीं नसावे ही किती लाजीरवाणी गोष्ट आहे !

| | किं. रु. | आ. | पै. |
|---|---|---|---|
| चारी मूल वेद ... ... ... ... ... ... ... | ५ | ० | ० |
| चारी वेदांची अनुक्रमणिका ... ... ... ... ... ... | १ | ८ | ० |
| शतपथ ब्राह्मण संपूर्ण १४ कांड ( हा प्रसिद्ध आर्षग्रन्थ आजपर्यंत भारतवर्षांत छापलेला नव्हता ) मूलमात्र ... ... ... | ४ | ० | ० |
| दशोपनिषद् मूल ( एक पुस्तक ) ... ... ... ... ... | ० | १० | ० |
| निघण्टु-वेदांचा कोश, अकारादि क्रमानें अनुक्रमणिकेसहित... ... | ० | ४ | ० |
| निरुक्त मूलमात्र ... ... ... ... ... ... ... | १ | ० | ० |
| अष्टाध्यायी मूलमात्र पाणिनि आचार्यकृत, शुद्ध केलेली ... ... | ० | ४ | ० |
| धातुपाठ धातूंच्या अकारादि क्रमानें अनुक्रमणिकेसहित ... ... | ० | ५ | ० |

## मराठी पुस्तकें.

| | | | |
|---|---|---|---|
| वैदिकधर्मस्वरूप ... ... ... ... ... ... ... | १ | ० | ० |
| ब्रह्मचर्य ... ... ... ... ... ... ... ... ... | ० | ४ | ० |
| शतशब्दरत्नमाला ईश्वरादि शंभर शब्दांच्या कवितावद्ध व्याख्या, लहान मुलांस कंठ करविण्यास फारच उपयोगी ... ... | ० | ० | ९ |
| देशाटन-ब्रह्मचारी नित्यानंद यांचें व्याख्यान ... ... ... | ० | २ | ० |
| लोकमान्य अठरा पुराणें कोणीं लिहिलीं ! याचें उत्तर ... ... | ० | ० | ३ |
| वैदिक संध्योपासनविधि ... ... ... ... ... ... | ० | ० | ६ |

वरील पुस्तकांचें टपाल हांशील निराळें पडेल.

**शामराव कृष्ण** आणि **मंडळी** ठाकुरद्वार, मुंबई.





अति स्वस्त!!

र्थ रचले त्यानेंच आमच्या
ळेंच आहे. आणि त्याच
पण हल्लीं ? वेदज्ञानाच्या

ख्रिस्ती व महंमदानुयायी
रे वेद (आमचे धर्मग्रंथ)
आहे!

| | | कि. रु. | आ. | पै. |
|---|---|---|---|---|
| ... | ... | ५ | ० | ० |
| ... | ... | १ | ८ | ० |
| आजपर्यंत | | | | |
| ... | ... | ४ | ० | ० |
| ... | ... | ० | १० | ० |
| ... | ... | ० | ४ | ० |
| ... | ... | १ | ० | ० |
| ... | ... | ० | ४ | ० |
| ... | ... | ० | ५ | ० |
| वैदिकधर्मस्वरूप ... ... ... ... ... ... ... | | १ | ० | ० |
| ब्रह्मचर्य ... ... ... ... ... ... ... ... | | ० | ४ | ० |
| शतशब्दरत्नमाला ईश्वरादि शंभर शब्दांच्या कवितावद्ध व्याख्या, लहान मुलांस कंठ करविण्यास फारच उपयोगी ... ... | | ० | ० | ९ |
| देशाटन–ब्रह्मचारी नित्यानंद यांचें व्याख्यान ... ... ... | | ० | २ | ० |
| लोकमान्य अठरा पुराणें कोणीं लिहिलीं ? याचें उत्तर ... ... | | ० | ० | ३ |
| वैदिक संध्योपासनविधि ... ... ... ... ... ... | | ० | ० | ६ |

वरील पुस्तकांचें टपाल हांशील निराळें पडेल.

**शामराव कृष्ण** आणि **मंडळी** ठाकुरद्वार, मुंबई.